महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाकडून अनुदान मिळालेले

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या
इतिहास संशोधन मंडळाची ग्रंथमाला क्र. २२

# ऐतिहासिक सनदा व पत्रे

: संपादक :

श्री. मा. भी. थोरात



[illegible] रुपये

इतिहास संशोधन मंडळ, दादर; मुंबई १४

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाकडून अनुदान मिळालेले

# ऐतिहासिक सनदा व पत्रे

: संपादक :

श्री. मा. भी. थोरात



शक १८९५ ( इ. स. १९७३ )



इतिहास संशोधन मंडळ, दादर; मुंबई १४

श्री. दौ. पां. घुमरे

बी. ए. ( ऑनर्स ) एल्.एल्. बी.

(वकील, नासिक)

यांसी सादर समर्पण

— मा. भी. थोरात

# सनदा पत्रांविषयी

या ग्रंथांत मराठेकालीन ७२ गावांची, जहागिरी व मोकासा अमला-बद्दलची ९३ अस्सल सनदा पत्रे आहेत. ती निःसंशय मोठ्या घटनेशी संबंधीत आहेत. माझ्या मते "आग्रा प्रकरणाशी" या वतनाचा मूळ संबंध पोचतो. कागदपत्रे वाचून आपलीही खात्री होईल. मराठ्यांच्या इतिहासातील " आग्रा प्रकरणाच्या " माहितीच्या पोकळीत या वतना संबंधी प्रस्तुत निवेदनात मी दिलेली माहिती जितकी स्वाभाविकपणे बसते तितकी ती अन्य कुठल्याच प्रसंगात बसत नाही.

महाराष्ट्राच्या इतिहासातील एका दैदिप्यमान व रोमहर्षक अशा प्रकरणावर, नवा प्रकाश टाकणाऱ्या या कागदपत्रासंबंधी, म्हणूनच अभ्या-साच्या सोयीसाठी या संदर्भात थोडा अधिक तपशीलवार खुलासा करणे जरूर वाटते.

**हे कागदपत्र कसे सांपडले–** या विषया संबंधी तसे मी बालपणापासूनच बरेच काही ऐकले आहे. परंतु मुख्यतः गेल्या तीन वर्षापासून या विषयाकडे माझे थोडे अधिक लक्ष गेले. त्यानंतर थोड्याच दिवसात मी हे काम हातात घेतले. दिनांक १७ नोव्हेंबर १९६७ रोजी दै. विशाल सह्याद्रीतून या विषयावर मी पहिले पत्र लिहिले. नंतर मासिकातून लेख लिहिले. तेव्हा आधारासाठी कागदपत्रांची गरज भासू लागली. मग मिळतील ती कागदपत्रे, वंशावळी, नामावळी, सनदापत्रे काम वाढत गेले. कथा आख्यायिकांचा नव्याने शोध घेतला. या विषयावर " आकाशवाणी"कडे एक भाषण लिहून पाठवले. लोकमानसात त्याला चांगला प्रतिसाद मिळाला. असा हळूहळू या कामाने आकार घेतला.

संबंधीत विषयावरील वाचन करावे लागले. त्यात एका लखोजीचा शोध घेत असताना दुसरा सापडला. तिसऱ्याचा शोध लागला. आणि मग सर्व प्रकरण चांगलेच लक्षात आले. या तिन्ही लखोजींच्या कथा, आख्या-

यिका, संबंधीत ठिकाणी सांगितल्या जात असत. परंतु कालदृष्ट्या इतिहासाशी त्यांचा मेळ बसत नसे. एकाची कथा दुसऱ्यात मिसळलेली असे. हा मेळ बसू लागला. त्यामुळे काम चालू ठेवण्यास धीर आला. वीरगांव व इंदोरी येथे आणखी कागदपत्रे मिळाली. वाळकी येथेही काही कागदपत्रे सापडली. त्यांचे वाचन चालू आहे. वाळकी येथील एक पत्र घाईगर्दीत या संग्रहात टाकले आहे. परंतु नंतर मिळालेली ही कागदपत्रे स्वतंत्रपणे पुन्हा केव्हातरी प्रसिद्ध करावी लागतील. कारण भिजून व फाटून त्यांची स्थिती शोचनीय झाली आहे. काही तुकडे हाती आले तर काही मिळाले नाहीत. या परिस्थितीतून मार्ग काढावयाचा आहे. त्यासाठी काही काळ थांबणे क्रमप्राप्त आहे. परंतु यातून मार्ग निघेल. येवढेच नाहीतर अधिक कागदपत्रे यथावकाश बाहेर येतील असा विश्वास वाटत आहे. प्रस्तुत ग्रंथातील सर्व ५३ अस्सल जुने कागद अत्यंत चांगल्या स्थितीत आहेत. ते सर्व अभ्यासनीय आहेत.

**सेनापती आनंदराव** :– छत्रपती शिवाजीमहाराज यांचे झुंजार सेनापती प्रतापराव व दुय्यम सेनापती आनंदराव हे अतिशय युद्धकुशल होते. अनेक युद्धात आपल्या युद्धनैपुण्याने त्यांनी शत्रूला जेरीस आणले होते. दोन किंवा तीन आनंदराव शिवाजी महाराजांच्या काळात होऊन गेले असावेत. ह्या निरनिराळ्या आनंदरावांची माहिती एकाच व्यक्तीच्या नावावर देण्यात इतिहासलेखनात काही चूक झाली असावी असे आनंदरावाची माहिती वाचून वाटते. खाली दिलेल्या हकीकतीवरून निर्माण होणारी विसंगती लक्षात येईल. ही विसंगती क्षुल्लक नाही. ती उपेक्षणीय तर मुळीच नाही. तर उपलब्ध माहिती अभावी 'आग्र्याहून सुटकेचा' एक प्रमुख सुत्रधार राघोमित्र मराठा व महाराजांचा दुय्यम सेनापती आनंदराव यांचे संबंधी माहितीचा व चरित्राचा संपूर्ण दुवा निखळून पडल्याने ही विसंगती निर्माण झाली असावी असे मला वाटते.

'श्रीशिवछत्रपति' या श्री. शेजवलकर यांच्या ग्रंथांत आनंदराव मकाजी या नांवाखाली (पृ. २९७ वर) पुढील प्रमाणे माहिती दिली आहे :- हा (आनंदराव मकाजी) प्रतापराव गुजर याच्या हाताखाली सरदार होता. आग्र्याच्या सुटकेनंतर शिवाजीचा मोगलांशी तह ठरला, त्यावेळी प्रतापराव

गुजर औरंगाबादेस मुअज्जमकडे गेला होता. त्याच्या बरोबर आनंदराव होता. शिवाजीचा मोंगलांशी झालेला तह मोडल्यावर दोघेही १४ डिसेंबर ते ११ जानेवारी १६७० च्या दरम्यान औरंगाबादेहून रायगडला परत आले....

इ. स. १६७२ मध्ये प्रतापराव व आनंदराव यांनी बहलोलखान, मोहोकमसिंग व दरकोजी भोसले यांना युद्धात पकडले आणि ११ हत्ती व १७००० घोडे पाडाव करून आणले.

प्रतापरावाने ९ मार्च ते ७ एप्रिल १६७३ च्या दरम्यान विजापुरी सरदार बहलोलखान याच्याशी उंबराणीला लढाई दिली. त्यावेळी आनंदराव त्यांच्या बरोबर होता.

२२ किंवा २३ मार्च १६७४ रोजी आनंदरावाने संपगांवची बाजारपेठ लुटली. ती लुटून येत असता त्याने खिदरखानाशी बंकापूर येथे लढाई दिली व दोन हत्ती काबीज केले.

आनंदराव शिवाजीबरोबर १६७७ मध्ये भागानगरला गेला होता....

२२ जुलै १६७८ रोजी आनंदराव व रघुनाथपंत हणमंते यांनी वेल्लूरचा किल्ला काबीज केला.

१० मार्च १६७९ रोजी आनंदरावाने थोरले बाळापूर (दोड्ड बाळापूर) जिंकले.

इ. स. १६७४ त औरंगजेबाचा कुतुबशाहीतील मुलूख उध्वस्त करण्यास व वाईपासून लक्षेमश्वरापर्यंतचा मुलूख आपल्या ताब्यात आणण्यास शिवाजीने आनंदरावास आज्ञा केली.

बहलोलखान आपल्यावर चाल करून येत आहे, असे कळताच शिवाजीने आनंदराव व प्रतापराव यांच्याशी गुप्त मसलत केली की, बहलोलखानास इतर सरदार येऊन मिळण्यापूर्वीच त्यावर हल्ला करावा. त्यांनी तलावास वेढा दिला. प्रतापरावाने प्रथम एकहजार स्वारानिशी हत्ती पाण्यास नेणाऱ्या शत्रूसैनिकावर हल्ला चढविल्यावर आनंदरावाने शत्रूच्या पिछाडीवर काही स्वारांसह हल्ला चढविला. स्वतः जखमी झाला असताहि त्याने शत्रू सैन्याची तीन घटका त्रेधा उडविली.

आनंदरावच्या संपगांवच्या लुटीचे वर्णन भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष ८, अंक १-२ पृ. २८ वर आले आहे. (पहा राजा शिव छत्रपती खं. ९, पृ. १२५).

वरील सर्व माहिती श्री. शेजवलकरांच्या 'श्री शिव छत्रपति' त पृ. २५७ वर आली आहे. याच ग्रंथात मकाजी आनंदराव या नावाखाली पृ. ४४८ वर पुढील माहिती आली आहे. 'मकाजी आनंदराव म्हणजे शहाजी यांचा फरजंद पाळलेला.' हा महाराजांकडून सेवा सोडून राजियाकडे आला होता. त्यास राजियांनी नांवेजून पागेची पंचहजारी सांगितली.

–सुरतेच्या स्वारीत शिवाजीने त्यास बरोबर घेतले.

–वणी दिंडोरीच्या लढाईत याचा पराक्रम दिसून आला.

–सालेरीच्या युद्धात आनंदरावाची पुन्हा एकदा चमक दिसली. या पराक्रमाबद्दल शिवाजीने आनंदरावास अपार द्रव्य दिले.

–शिवाजी कर्नाटकांतून मध्येच परत फिरला त्यावेळी आनंदराव त्यांच्या बरोबर होता.

संभाजी मोंगलांकडून रुसून परत आल्यावर शिवाजीने त्याची समजूत घालून त्यास आपल्या राज्याच्या व्यवस्थेची कल्पना दिली. त्यावेळी संभाजीस सांगितलेल्या शिलेदारांच्या यादीत आनंदराव हजारी दिसतो.

शिवाजी तह करण्यासाठी जयसिंगाकडे गेला त्यावेळी आनंदराव त्यांच्या बरोबर होता. भेटीच्या वेळी तो शिवाजीचा जोडा घेऊन उभा राहिला.

श्री. शेजवलकर यांच्या याच ग्रंथात आनंदराव संबंधी खालील माहिती निरनिराळ्या संदर्भात वेगवेगळ्या पृष्ठावर आली आहे.

पृष्ट १३८– संभाजीने आपली गादी मिळविण्याचा प्रयत्न सुरू केला व हंबीररावकडे हेर पाठवून त्याच्या हाताखालच्या आनंदराव, मानाजी मोरे प्रभृति मुख्य सरदारांना दिल्लीश्वरापासून राज्याच्या रक्षणासाठी आवाहन केले.

पृष्ठ १४९.... हंबीरराव, आनंदराव, मानाजी मोरे प्रभृति लष्करातील बड्या अधिकाऱ्यांनी शिवाजीच्या मरणामुळे अकस्मात प्राप्त झालेली मोकळे होण्याची ही संधी संभाजीला मिळून साधण्याचा निश्चय केला.

पृष्ठ १६५ – व्यंकाजी दत्तो व थोरले आनंदराव यांसारखे शहाजीच्या हाताखाली काम केलेले सरदार आपापल्या जमेतीनिशी महाराष्ट्रात परत येऊन शिवाजीचे नोकर बनले होते, असे सभासद सांगतो.

पृ. १८४ : – '''अखेर तो किल्ला नरहरीरुद्र व मकाजी आनंदराव यांनीं हणमंते जिंजी प्रांताचे सुभेदार असता जिंकला.

पृ. १९९ – तो प्रदेश जिंकणाऱ्यापैकी मानाजी मोरे याला कोलारास ठेऊन आनंदरावास शिवाजीने आपणा बरोबर महाराष्ट्रात आणले.

पृ. ५११ – कर्नाटकातील स्वारी आटोपून शिवाजी परत येत असता आनंदराव फर्जंद कुवर (आनंदराव मकाजी) मानाजी माने म्हसवडकर हे दोघे त्याबरोबर होते.

पृ. ३२० – १० मार्च १६७९ रोजी आनंदरावाने बाळापूर काबीज केले. जेधे शकावलीत थोरल्या आनंदरावाने बाळापूर घेतले असे आहे. त्याऐवजी आनंदरावाने थोरले बाळापूर घेतले अशी नोंद पाहिजे.

अशा तऱ्हेने आनंदराव, थोरले आनंदराव, आनंदराव मकाजी, आनंदराव फर्जंद कुवर, ही निरनिराळी नांवे निरनिराळ्या ऐतिहासिक साधन ग्रंथावरून व साधनांतून घेऊन ती सर्व एकाच व्यक्तीची आहेत, असे मानून इतिहास ग्रंथात त्यांची माहिती एकत्र करून लिहिली आहे असे दिसते. म्हणून तीत एवढी विसंगती आलेली आहे. ही विसंगती ठळक जाणवते. मकाजी आनंदराव म्हणजेच महाराज शहाजी यांचा फर्जंद शहाजी म्हणजे पुत्र शहाजी असे स्वतःस अभिमानाने म्हणवून घेत असत असे ९१ कलमी बखरीच्या प्रस्तावनेत एके ठिकाणी म्हटले आहे. प्रतापरावाच्या मृत्यूनंतर महाराजांना धीराचे पत्र लिहिणारा आनंदराव व जयसिंहाचे भेटीचेवेळी महाराजांचा जोडा घेऊन उभा राहिलेला आनंदराव ह्या एकच व्यक्ती दिसत नाहीत. थोरलें आनंदराव आणि आनंदराव एकच काय ? ही सर्व माहिती अपूर्ण आणि बरीचशी विसंगत वाटते. ही विसंगती शोधल्यास अधिक सापडेल. कोठे राघो मित्रास ब्राह्मण म्हटले आहे, तर कोठे आनंदरावास तो व्यंकोजीकडून आला असल्याबाबत उल्लेख आहे. माझ्या मते आनंदराव आणि राघो मित्र मराठा हे भाऊ थोरात दिनकरराव घराण्यातील

असून वाळण्यास थोरातांचे घराणे फार पुरातन काळापासून आहे. वाळण्याचे जुने नांव वाल्मीकीपूर होते. तेराव्या शतकापासून थोरातांचे हे घराणे तेथे होते. या संबंधी उल्लेख अस्सल कागद पत्रात मिळतील.

काळानुसार प्रत्येक पिढीत होणारी स्थित्यंतरे, भौतीक परिस्थितीत झालेले फेरफार विचारात घेऊन या प्रकरणाकडे पाहिल्यास बरीच माहिती या कागद-पत्रातून मिळेल. उदा. दिनकरराव पदवी संबंधी विचार केल्यास रविराऊ आणि दिनकरराव या एकाच अर्थाच्या दोन पदव्या दिसतात. लुखजी रविराऊ हे नांव शिवकालीन कागदपत्रात आढळते. येवढेच नाही तर याच भागात वाळकीजवळ झालेल्या एका पंचायतीत (गोत सभेत) तो हजर असल्याचा उल्लेख आढळतो. तसेच थोरात घराण्यातील शिवकालीन सेनापती आनंदराव थोरात यासंबंधीची माहिती इथे लक्षांत घेतल्यास कागदपत्रातील मजकूरावर जास्त प्रकाश पडेल म्हणून ती इथे देतो.

आग्र्याहून सुटकेच्या संदर्भात राघोमित्रासंबंधी अधिक माहिती पुढील काही उताऱ्यावरून लक्षांत येईल. "बाहेर रानात निराजी रावजी, दत्ताजी त्रिंबक, रघुमित्र हे गृहस्थ घोडे सज्ज करून तयार होते" (म. रि. श. शि.) "राजे व राजपुत्र व नारायण रघुनाथराव व रघुनाथपंत कोरडे व निराजीपंत व दत्ताजीपंत त्रिंबक व मुदगलभट व राघो मित्र मऱ्हाठा अशा आसाम्या यांनी गोसावी व बैरागी व फकिर यांची सोंगे घेऊन अंगास राख लावून वाराणसीस चालिले" (म. द. र. १ ले, १ श्री. म. भो. बखर) "...राघो मराठा गोसाव्यांच्या तांड्याचा नोकर ह्यास हुजरियांच्या नाईक नेमिले" (श्री. शि. च. चि. वि. वै.) अशा तऱ्हेची थोडी परंतु नजरेत भरणारी माहिती राघो मित्रा संबंधी मिळते. सेनापतीपद ही काय कुणालाहि देण्याची वस्तू आहे. निश्चित नाही. परंतु त्यासाठी नाही. तर आग्र प्रकरण अधिक तपशीलाने पहाण्यासाठी 'राघो मित्र मराठा' याचा अधिक अभ्यास झाला पाहिजे असे मला वाटते. कारण राज्याभिषेक समयी अष्ट प्रधानांच्या नेमणुका करतांना पदव्या वगैरे देतांना आग्र्यास आपल्याबरोबर असलेल्या व विशेष कार्य करणाऱ्या लोकांनाच शिवाजी महाराजांनी अधिक प्राधान्य दिले होते हे इतिहासावरून व अष्टप्रधानांच्या झालेल्या नेमणुका वगैरे वरून, दिलेल्या पदव्या इत्यादीवरून सहज लक्षात येण्यासारखे आहे.

'राघो मित्र' 'आग्र्यात' आणि ' राज्याभिषेका'त प्रामुख्याने दिसतो. परंतु पुढे तो एकदम अदृश्य होतो. त्याचा शोध घेतला पाहिजे. याचे आणखी एक प्रमुख कारण असे की, उपलब्ध इतिहासात त्याचे स्पष्ट चित्र दिसत नाही. 'ते समयी राघो मित्र याने बहुतश्रम समागमे केला दिलीस बराबर होता यैसे पाहून त्यास सेनापती देऊन उभा केला' किंवा त्यास 'हुजुरीयांचा नाईक नेमिले' याचा नेमका अर्थ काय? दोन्हीपैकी निश्चित काय केले हे समजत नाही. यापुढील त्याचे कुठलेही लहान मोठे कार्य इतिहासात नमूद नाही. त्याचा पूर्वेतिहास कुठे आढळत नाही. या पार्श्वभूमिवर तर माझा तर्क अधिक भक्कम वाटत आहे.

थोरात दिनकरराव घराण्यातील कथा आख्यायिकात मला प्रथमपासून बराच अर्थ दिसत होता. त्यांचा सतत पाठपुरावा मी केला. त्यातून अनेक कागदपत्र मिळाले. कागदपत्रावरून इतिहास मिळतो. कथा आख्यायिकांचा अगदी शब्दशः अर्थ घेऊन काहीच निष्पन्न होणार नाही. त्या एकदम डावलूनही काम भागत नाही. त्या मार्गातील खुणा समजून अस्सल कागद-पत्रांच्या आधारे वाट मी स्वतःच शोधली. कारण निव्वळ कागदपत्रावर विसंबून राहून पुष्कळदा काही बोध होत नाही. कारण अशा कागदपत्रांच्या बाबतीत दुर्दैवाने आपण येवढे भाग्यवान नाही. सारासार विचारांचा, तर्काचा आधार हा कुठे तरी शेवटी घ्यावाच लागतो. आणि म्हणून 'राघो मित्र मराठा,' म्हणजेच लखोजी असा माझा साधार तर्क आहे. या तर्कास पुष्टी देणाऱ्या अनेक गोष्टी आहेत. त्यांचा तपशील या कागदपत्रात मिळण्यासारखा आहे.

महाराज रविवारी आग्र्याहून सुटले. दिनकरराव पदवीची कथा आग्र्याहून सुटकेच्या प्रसंगाशी पदवीचा संबंध दर्शविते. लुखजी रविराऊ हे नाव अस्सल शिवकालीन कागदपत्रात आढळते. वाळकी जवळीलच एका गोत सभेत तो हजर होता. आग्र्याहून सुटकेच्या थोरात घराण्यातील दंतकथा या कपोलकल्पीत कथा नाहीत. त्या घराण्यात परंपरेने चालत आलेल्या आहेत. त्यामागे काही परंपरागत रितीरिवाज आहेत. उदा. राज्याभिषेक प्रसंगाचे स्मरण म्हणून किंवा आग्र्याहून सुटकेच्या प्रसंगाचे स्मरण म्हणून मध्यरात्री आणि पहाटेच्या त्या विशिष्ट वेळी, विशिष्ट तिथीसि घराण्यात परंपरेनें स्मृति उत्सव अगदी

अलिकडच्या काळापर्यंत परंपरेने साजरा होत असे. योग असा की, आग्र्याहून सुटकेची वेळ आणि राज्याभिषेकाची वेळ ही सारखीच असून ती या वेळेशी जुळते. लखोजीचे वडिल महाराजांच्या प्रारंभीच्या सैन्यात होते. लखोजीचे दुसरे नाव राघोजी होते. असा कथा आख्यायिकात सूर उमटतो. म्हणून त्यास त्याचे बरोबर आग्र्यास असणाऱ्या बरोबरीच्या मंडळीत राघोमित्र नावाने संबोधणे शक्य होते. आडनाव मराठा लिहिण्याची वहिवाट थोरात घराण्यात होती. नामावळी व घराण्यातील वंशावळ पहाता राघोजी व लखोजी हे नाव चालत आले आहे. लखोजीच्या उत्तरआयुष्यातील वैराग्याची कथा ही अर्थपूर्ण आहे. आणि शेवटी या संदर्भात आणखी एका गोष्टीचा उल्लेख करणे जरूर आहे. तो म्हणजे त्र्यंबकेश्वर येथील थोरांताचे तीर्थोपाध्याय श्री. पेंडोळे यांच्याकडील एका नामावळीचा. ती नामावळ अशी– " म्रं रंभाजी पाटील पीते तुकोजी आजे सेटयाजी पं पंजे लखमोजी पंजे राघोजी लुखजी बा पाटील ........ गांव वाळकी " आडनाव मराठे असा उल्लेख नासिक नामा वळीत येतो. तेव्हा राघो मित्र मराठा म्हणजेच लखोजी असा माझा साधार तर्क आहे. लखमोजी आणि राघोजी लुखजी हे एकाच इसमाचे नांव आहे. त्याची फोड करण्यासाठी नामावळीत पंजाचे नांव मुद्दाम दोनदा लिहिले आहे असे मला वाटते. त्या शिवाय या नामावळीत असे दोनदा लिहिण्याचा दुसरा अर्थ नीट लागत नाही. लखमोजी म्हणजेच जर राघोजी तर मग राघो मित्र मराठा म्हणजेच लखोजी तोच राघो मित्र नावाने जुन्या कागदपत्रात आढळतो असा निष्कर्ष काढणे क्रमप्राप्त होते. असा निष्कर्ष काढल्याखेरीज हे गणित सुटणार नाही असे मला वाटते. परंतु असा काही निष्कर्ष काढण्याची इतक्यात घाई नको म्हणून मी यास सिद्धांत म्हणत नाही, साधार तर्क म्हणतो.

वरील गोष्टीची नोंद उपलब्ध इतिहासात घेतली गेली नसल्याने इतिहास राघो मित्रासंबंधी कमी बोलतो, असे मला वाटते. या प्रश्नाच्या अधिक अभ्यासाने तो कदाचित अधिक बोलू शकेल.

ही कागदपत्रे मुखतः इ. सन १७०९ ते इ. सन १७८७ पर्यंतची आहेत. नंतरचीही काही थोडी आहेत. काल दृष्टया पत्रावरील तारखांचे दृष्टीने सर्वात जुने पत्र इ. सन १७०९ चे आहे. बिन तारखेची परंतु काळाच्या

दृष्टीने त्याही अगोदरची दोन पत्रे छ. शाहू महाराज यांची यात आहेत-प्रसंगानुसार त्यात त्यांनी त्याही पूर्वीची काही माहिती दिली आहे. आणि म्हणून या समग्र पत्रसंग्रहाचा एकत्रीत विचार थेट शिवकालापासून करता येणे शक्य झाले आहे. हे या पत्रसंग्रहाचे एक खास वैशिष्ट्य आहे. या दृष्टीने हा पत्रसंग्रह मौलीक आहे.

काही थोड्या पत्रातून किंवा एकाच ऐतिहासिक घराण्याच्या माहितीतून इतिहासाची मर्यादित माहिती आपल्याला कळते. परंतु इतर सर्व ज्ञात अज्ञात माहितीच्या संदर्भात अशा तोकड्या माहितीचा विचार अभ्यासकाला करावा लागतो. तसा विचार केला तरच अशा छोट्या माहितीचा व्यापक अर्थ ध्यानात येतो. या तत्वाने शिवकालीन इतिहासातील सुरवातीच्या काही मोजक्या घराण्यापैकी थोरातांचे घराणे हे बरेच प्रमुख दिसते. आणि त्या घराण्याच्या करीण्यात शिवकालीन इतिहासातील अत्यंत महत्त्वाच्या घडामोडींच्या माहितीचे धागे मिळतात. म्हणून काल दृष्ट्या हे कागदपत्र शिवकालानंतरचे असले तरी इतिहासाच्या माहितीच्या दृष्टीने त्यांची उपयुक्तता कितीतरी अधिक ठरते. शिवकालीन अनेक छोट्यामोठ्या घटनांचा मागोवा त्यामुळे अभ्यासकला घेता येतो. म्हणून हा पत्रसंग्रह मला फार मौलीक वाटतो.

उपलब्ध ऐतिहासिक साधनांच्या पार्श्वभूमिवर या पत्रसंग्रहाचा विचार केल्यास आजवर आपणास ज्ञात असलेल्या इतिहासात अनेक त्रुटी त्यामुळे जाणवतात. या पत्र संग्रहाच्या अभ्यासामुळे तत्कालीन आणि शिवकालीन बऱ्याच महत्त्वाच्या व्यक्ती आणि घटना यावर नवा प्रकाश पडेल. उदा. महाराजांचा एक झुंजार सेनापति आनंदराव, या व अशा महत्त्वाच्या व्यक्ति आणि आग्र्याहून सुटका, जालन्यावरील हल्ला आणि या सारख्या महत्त्वाच्या घटनांवर या अभ्यासातून नवा प्रकाश टाकता येईल. या बद्दल मला तिळमात्र शंका नाही.

नगर जिल्ह्यातील, आकोले तालुक्यातील, वीरगांव येथे थोरात दिनकरराव घराण्यात सुमारे सहा वर्षापूर्वी हा मूळ मोडी अस्सल पत्र संग्रह मला प्रथम मिळाला. तो छापण्यापूर्वी लिप्यंतर करून, नकलून त्याचा शोध बोध घेऊन, दुसऱ्या अनेक ज्ञात अज्ञात साधनांच्या आधारे त्या संबंधी माहिती मिळवून त्याचे ऐतिहासिक महत्त्व मला निश्चित करावे लागले. त्यातून मिळालेली

माहिती माझ्या 'ऐतिहासिक लेख संग्रह' या दुसऱ्या एका छोट्या पुस्तकात मी प्रसिद्ध केली आहे. त्या माहितीचाही उपयोग या पत्र संग्रहाच्या अभ्यासकांना होईल. त्यात चर्चीलेली साधनेही दुर्लक्ष करता येण्याजोगी नाहीत. अभ्यासकांनी ती माहिती जरूर पहावी.

या कामाचे श्रेय कुणाही एकट्याच्या कर्तृत्वाकडे जात नाही, याची मला जाणीव आहे. थोरातांनी कागदपत्र दिले. जाणत्यांनी मार्गदर्शन केले. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाने अनुदान दिले. मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या इतिहास संशोधन मंडळाने हा ग्रंथ प्रकाशात आणून गेल्या काही वर्षाच्या काहीशा कठोर मेहनतीचे चीज केले असे मला वाटते. त्याबद्दल मी सर्वांचा अत्यंत ऋणी आहे. या कामातील सर्वच सहाय्यकर्त्यांचा मी अत्यंत आभारी आहे. शेवटी सांगावयाचे म्हणजे इतिहासाचे ज्ञान म्हणजे मानवी जीवनाचे, आणि मनुष्य स्वभावाचे खरेखुरे ज्ञान होय. टिकावू आणि चिरंतन अशा जीवन मूल्यांचा शोध इतिहासाच्या अभ्यासातूनच लागतो. म्हणून तो परीश्रमपूर्वक व बिनचूक लिहिला गेला पाहिजे, असे मला वाटते. इतिहासाचे यथार्थ ज्ञानच माणसाला प्रगती आणि समृद्ध संस्कृतीकडे घेऊन जाईल अशी माझी श्रद्धा आहे. अशा एका चांगल्या कार्यास अल्पसा हातभार लावण्याचे पुण्य मला जोडता आले म्हणून श्रद्धायुक्त अंतःकरणाने, आनंदाने, परंतु नम्रतेने मी ही छोटीशी भेट वाचकांच्या हातात देत आहे.

मा. भी. थोरात

सिन्नर

दिनांक २४-९-७२

मु. कासर वाडी, पो. चास,

ता. सिन्नर, जि. नासिक.

# निवेदन

श्री. थोरात यांनी थोरात घराण्यांतील आनंदराव व राघो मित्र या दोन पराक्रमी व्यक्तींच्या पराक्रमाची गाथा सांपडण्यासाठी थोरातांच्या ज्या अनेक शाखा महाराष्ट्रांत विखुरलेल्या आहेत त्यांजकडून कागदपत्र जमविले. हे कागदपत्र बहुतेक सनदा आहेत. ह्या सनदा पेशवेकालांतील, पण पेशवे कालांत या सनदा ज्या घराण्यांकडे चालू राहिल्या त्यांच्या पूर्वजांनी शिव-काळांत स्वातंत्र्यसंस्थापनार्थ बहुत पराक्रम केलें त्यांची नांवे सेनापती आनंदराव राघोमित्र, राघो मराठा अशी असावी असा श्री. थोरातांचा तर्क. हा तर्क खरा असल्याबद्दलचा आपला दावा त्यांनी वाचकांसमोर प्रस्तावनेत माडलेला आहे.

पत्रांचा परामर्श घेण्याची कामगिरी श्री. थोरातांकडून होणेची राहिली आहे. ऐतिहासिक कागदपत्र निरनिराळ्या घराण्याकडून मिळवून ते प्रसिद्ध करताना त्याजवर संशोधकीय संस्कार करण्याचे काम या अगोदरच्या पिढीतील मान्यवर इतिहाससंशोधकांनी केलेले आहे. हे आदर्श श्री. थोरात यांनी समोर ठेवून आपल्या संशोधन कार्यास आकार आणणे इष्ट होय.

श्री. थोरात यांनी आपले हे कागदाचे बाड साहित्य आणि संस्कृति मंडळ या संस्थेकडे छापण्यासाठी पाठविले होते. त्या संस्थेनें त्यांतील कागदाचे मूल्यमापन करून ते छापण्यास योग्य आहेत असे ठरवून केवळ छपाईकरिता ते इतिहास संशोधन मंडळाकडे दिले ती कामगिरी आज आम्ही पार पाडीत आहोत.

वि. गो. खोबरेकर
डायरेक्टर
इतिहास संशोधन मंडळ, मुंबई

प. क्र. १
सु. ११०८, रमजान १८
पो छ २१ रमजान

श्री

शा. १६३०, मार्गशीर्ष व॥ ४
इ. १७०८, नोव्हेंबर २०

श्री उमाकांत
पदांभोज भजनाप्र
समुन्नते : ॥ बाळाजी
वीश्वनाथस्य मुद्रा
विजयंतत राम्

छु मा॥ अनाम देसमुख व देसपाडिये पा॥ आकोळे यासि बाळाजी विश्वनाथ सेनाकर्ते सु ॥ तिसा मिया अलफ प ॥ मा॥र राजश्री सखोजी थोरात याकडे पेसजी मुकासा आहे तेणे प्रमाणे करार आहे तरी तुम्ही कोणेविसी काही दिक हरकत न करितां सुरलीत उसूल देणे आणिक कोणाकडे उसूल न देणे राजश्री रायाजी मलार व राजश्री तानको प्रभू याचे कागद आले असतील तरी त्यावरी नच जाणे मा॥रनिलेचे मुकासे मा॥र-निलेसच करार आहेती तरी हिका हरकत न करिता उसूल देणे हरकत फितवा केलीयाने जिवे मारिले जाल मुलाहिजा होणार नाही जाणन लिहिले प्रमाणे वर्तणुक करणे जाणिजे छ १८ रमजान प ॥ हुजूर

मोर्तब
सुद

सुरु सुद

प. क्र. २ श्री {श. १६३८, पौष शु॥ १२
सु. १११७, मोहरम ११ {इ. १७१६, डिसेंबर १५

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवछरे पौष्य शुद्ध द्वादसी भृगुवासर क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी

| | | |
|---|---|---|
| श्री | | देशमुख व देशपाडिये |
| राजा शाहू न | श्री आइ आदि | ता। पाबळ प्रांत जुनर |
| रपति हर्षनिधा | पुरुष श्रीराजा शाहू | यासी अज्ञा केली |
| न बाळाजी विश्व | छत्रपति स्वामी कृपानि | अैसीजे त॥ मजकूर |
| नाथ मुख्य प्र | धी तस्य परशुराम त्र्यं | पैकी देहाये पेशजीच्या |
| धान | बक प्रतिनिधी | मुकासियाकडून दूर |

करून हाली राजश्री सेखोजी थोरात दिनकरराव यांजकडे जमावाचे बेगमी बदल मुकासा दिल्हा आसेत बित॥ लाखणगाव देवगाव सवदणे एकूण देहे
१ १ १
तीन दिल्हे असत. तर तुम्ही यासी रुजू होऊन देहाये मा॥रचे मुकासबाबेचा अैवज मा॥रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

मर्या
देयं रा
जते

रूजू स॥
मंत्री

तेरीख १० महरम सु॥ सबा
बार सुरु सुद बार बार

पत्र क्र. ३<br>सु. ११११७, मोहरम ११ } श्री { श. १६३८, पौष शु॥ १२<br>इ. १७१६, डिसेंबर १५

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुख नाम संवत्सरे पौष्य शुद्ध द्वादसी भृगुवासर क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी देशमुख व देशपाडिये पा॥ आंकोले प्रो संगमनेर यांसी अज्ञा केली ऐसीजे

| | | |
|---|---|---|
| ◡ श्री ○ | ○ ○ ◡ | पा॥ मजकूर पेशजीच्या |
| राजा शाहू न | श्री आई आदि | मुकासियाकडून दूर करून |
| रपती हर्षनिधा | पुरूष श्री राजा शाहू | हाली राजश्री सेखोजी |
| न बाळाजी विश्व | छत्रपती स्वामी कृपानि | थोरात याजकडे जमावाचे |
| नाथ मुख्य प्र | धी तस्य परशुराम त्र्यं | बेगमीबदल फुट मुकासा |
| धान | बक प्रतिनिधी | वजा करून दिल्हा आसे |

तर तुम्ही यांसी रुजू होऊन पा॥ मा॥रचे मुकासब्राबेचा अैवज मा॥रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

**मर्या**<br>**देयं रा**<br>**जते**

**रुजू सु॥**<br>**मंत्री**

तेरीख १० मोहरम सु ॥ सबा<br>बार सुद सुरू सुद बार बार

प. क्र. ४
सु. १११७, मोहरम ११

श्री

श. १६३८, पौष शु॥ १२
इ. १७१६, डिसेंबर १५

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुख नाम संवत्सरे पौष्य शुद्ध द्वादसी मंदवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी मोकदमानी मौजे नेतवडी ता॥ वोतूर प्रा॥ जुनर यांसी अज्ञा केली असीजे

| | | |
|---|---|---|
| श्री | | मौजे मजकूर पेशजीच्या |
| राजा शाहू न | श्री आई आदि | मुकासियाकडून दूर |
| रपति हर्षनिधा | पुरुष श्री राजा शाहू | करून हाली राजश्री |
| न बाळाजी विश्व | छत्रपति स्वामी कृपानि | सेखोजी थोरात दिनकर- |
| नाथ मुख्य प्र | धि तस्य परशुराम त्र्यं | राव याजकडे जमावाचे |
| धान | बक प्रतिनिधि | बेगमीबदल मुकासा |

दिल्हा आसे तर तुम्ही यासी रुजू होऊन मौजे मजकूरचे मुकासबाबेचा अवज मा॥रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

मर्या
देयं रा
जते

रूजू सु॥
मंत्री

तेरीख १० महरम सु॥ सबा
बार सुद सुरु सुद बार बार

पत्र क्र. ५
सु. ११२७, मोहरम ११ } श्री { श. १६३८ पौष शु॥ १२
इ. १७१६, डिसेंबर १९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे पौष्य शुध्द द्वादसी भृगुवासर क्षेत्रीय कुलवतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी देशमुख व देशपांडिये त ॥ आले (आळे) प्रा॥ जुनर यासी अज्ञा केली अैसीजे ता॥

| | | |
|---|---|---|
| श्री | | मा॥र पैकी देहाये |
| **राजा शाहू न** | **श्री आई आदी** | पेशजीच्या मुकासिया- |
| **रपती हर्षनिधा** | **पुरुष श्री राजा शाहु** | कडून दूर करून हाली |
| **न बाळाजी विश्व** | **छत्रपती स्वामी कृपानि** | राजश्री सेखोजी थो |
| **नाथ मुख्य प्र** | **धी तस्य परशराम त्र्यं** | दि न क रा व यां ज क डे |
| **धान** | **बक प्रतिनिधि** | जमावाचे बेगमीस मु॥ |

दिल्हे आसेत देहाये बि ता॥ मौजे जाबूत मौजे पिंपरखेड थेकून देहे दोनी
१ १
दिल्हे असत तर तुम्ही यासी रुजू होऊन देहाये मा॥रन्चे मुकासबाबेचा अैवज मा॥रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

**मर्या**
**देयं रा**
**जते**

**रुजू स ॥**
**मंत्री**

तेरीख १० महरम सु ॥ सबा
बार सुद सुरु सुद बार बार

प. क्र. ६
सु. १११७, मोहरम ११

श्री

शा. १६३८, पौष शु॥ १२
इ. १७१६, डिसेंबर १५

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे पौष्य शुद्ध द्वादशी भृगुवासर क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी देशमुख व

**श्री**
**राजा शाहू न**
**रपती हर्षनिधा**
**न बाळाजी विश्व**
**नाथ मुख्य प्र**
**धान**

**श्री आई आदि**
**पुरुष श्रीराजा शाहू**
**छत्रपती स्वामी कृपानि**
**धी तस्य परशुराम त्र्यं**
**बक प्रतिनिधी**

देशपांडिये ता॥ साडस प्रांत पुणे यासी अज्ञा केली असीजे ता॥ मा॥र पैकी देहे पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून हाली राजश्री सेखोजी थोरात दिनकरराव यांजकडे जमात्राचे बेगमी बदल मुकासे दिल्हे आसेत बि ता॥ मौजे वाळकी १ भावडी १ सिरसवाडी १ बोरीभडक १ मौजे दालिब १ मौजे तरडे १ येकून देहे साहा दिल्हे आसत तर तुम्ही यासी रुजू होऊन देहाये मा॥रचे मुकासबाबेचा अवज मा॥रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

**मर्या**
**देयं रा**
**जते**

**रुजू सा॥**
**मंत्री**

तेरीख १० महरम सु॥ सबा
बार सुद सुरू सुद बार बार

| | | |
|---|---|---|
| पत्र क्र. ७<br>सु. ११७, मोहरम ११ | श्री | श. १६३८, पौष शु॥ १२<br>इ. १७१६, डिसेंबर १५ |

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे पौष्य शुध्द द्वादसी भृगुवासर क्षेत्रीय कुलांवतस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी देशमुख

| | | |
|---|---|---|
| ⌣ श्री ○<br>**राजा शाहू न**<br>**रपती हर्षनिधा**<br>**न बाळाजी विश्व**<br>**नाथ मुख्य प्र**<br>**धान** | ○ ⌣<br>**श्री आई आदि**<br>**पुरुष श्रीराजा शाहू**<br>**छत्रपती स्वामी कृपानि**<br>**धी तस्यपरशुराम त्र्यं**<br>**बक प्रतिनिधी** | व देशपाडिये त॥<br>पेडगांव प्रांत कडेवलीत<br>यासी आज्ञा केली<br>अैसीजे त॥ मा पैकी<br>देहाये पेशजीच्या<br>मुकासिया कडून दूर |

करून हाली राजश्री सेखोजी थोरात दिनकरराव याजकडे जमावास मुकासे दिल्हे आसेत बि तपसील

| | |
|---|---|
| मौ रतडगांव | मौजे उदरगाव |
| १ | १ |

येकून दोनी देहे दिल्हे असत तर तुम्ही यासी रुजु होऊन देहाय मा॥रचे मुकास बाबेचा अैवज मा॥रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

**मर्या**
**देयं रा**
**जते**

**रुजू स ॥**
मंत्री

तेरीख १० महरम सुा सबा
बार सुद सुरु सुद बार बार

पत्र क्र. ८
सु. १११७, मोहरम ११

श्री

शा. १६३८, पौष शु॥ १२
इ. १७१६, डिसेंबर १९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे पौष्य शुद्ध द्वादसी मंदवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यांणी देशमुख व देशपाडिये प॥ मुरोली प्रांत सुरत यांसी अज्ञा

| | |
|---|---|
| श्री | |
| राजा शाहू न | श्री आई आदि |
| रपती हर्षनिधा | पुरुष श्रीराजा शाहू |
| न बाळाजी विश्व | छत्रपती स्वामी कृपानि |
| नाथ मुख्य प्र | धी तस्य परशुराम त्र्यं |
| धान | बक प्रतिनिधी |

केली ऐसीजे प॥ मजकूर पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून हाली राजश्री सेखोजी थोरात दिनकरराव यांजकडे जमावाचे बेगमी बदल आता दिल्हा असे तर तुम्ही यासी रुजू होऊन प॥ मा॥रचे मुकासबाबेचा ऐवज मा॥रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

मर्या
देयं रा
जते

रुजू स॥
मंत्री

तेरीख १० महरम सु॥ सबा
बार सुद सुरू सुद बार बार

पत्र क्र. ९
सु. ११२७, मोहरम ११

श्री

शा. १६३८, पौष शु॥ १२
इ. १७१६, डिसेंबर १९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे पौष्य शुद्ध द्वाद भृगुवासर क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यांणी

**श्री**
**राजा शाहू न**
**रपती हर्षनिधा**
**न बाळाजी विश्व**
**नाथ मुख्य प्र**
**धान**

**श्री आई आदि**
**पुरुष श्री राजा शाहू**
**छत्रपती स्वामी कृपानि**
**धी तस्य परशुराम त्र्यं**
**बक प्रतिनिधि**

देशमुख व देशपांडिये पा। सिनर प्रांत सगमनेर यांसी अज्ञा केली ऐसीजे पा। मजकूर पैकी कसबा खेरीज करून बाकी मो पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून हाली राजश्री सेखोजी थो दिनकरराव यांजकडे मुकासा दिल्हा आसे तर तुम्ही यांसी रुजू होऊन पा॥ मा॥रचे मुकास बाबेचा ऐवज कसबा खेरीज करून भा॥रा॥निलेकडे वसूल देणे लेखनालंकार

**मर्या**
**देयं रा**
**जते**

**रुजू सु॥**
मंत्री

तेरीख १० महरम सु॥ सबा
बार सुद सुरु सुद बार बार

पत्र क्र. १०
सु. १११७, मोहरम ११

श्री

श. १६३८ पौष शु॥ १२
इ. १७१६, डिसेंबर १९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे पौष्य शुद्ध द्वादसी मंदवासर क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी देशमुख

**श्री**
**राजा शाहू न**
**रपती हर्षनिधा**
**न बाळाजी विश्व**
**नाथ मुख्य प्र**
**धान**

**श्री आई आदि**
**पुरुष श्री राजा शाहू**
**छत्रपी स्वामी कृपानि**
**धी तस्य परशुराम त्र्यं**
**बक प्रतिनिधि**

व देशपाडिये प॥ चौऱ्यासी प्र॥ सुरत यांसी अज्ञा केली अैसीजे प॥ मजकूर पेशजीच्या मुकासिया- कडून दूर करून हाली राजश्री सेखोजी थोरात दिनकरराव याजकडे जमावाचे बेगमीस मुकासा दिल्हा आसे तर तुम्ही यासी रुज होऊन प॥ मा॥रा॥चे मुकासबाबेचा अैवज मा॥रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

**मर्या**
**देयं रा**
**जते**

**रुजू स॥**
**मंत्री**

तेरीख १० महरम सु॥ सबा
बार सुद सुरू सुद बार बार

पत्र क्र. ११
सु. ११२७, मोहरम ११ } श्री { श. १६३८, पौष शु॥ १२
इ. १७१६, डिसेंबर १९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे पौष्य शुद्ध द्वादसी भृगुवासर क्षेत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी देशमुख व देशपाडिये ता॥ नगरहवेली प्र॥ कडेवलीत यांसी अज्ञा केली असीजे ता॥ मजकूर मारपैकी ता॥ देहाये पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून

**श्री**
**राजा शाहू न**
**रपति हर्षनिधा**
**न बाळाजी विश्व**
**नाथ मुख्य प्र**
**धान**

**श्री आई आदि**
**पुरुष श्रीराजा शाहू**
**छत्रपति स्वामी कृपानि**
**धी तस्य परशुराम त्र्यं**
**बक प्रतिनिधि**

हाली राजश्री सेखोजी थोरात दिनकरराव यांजकडे जमावाचे बेगमीस मोकासा दिल्हा आसे बि तो

| मौजे देवगाव | मौजे तरडगाव |
|---|---|
| १ | १ |

येकून देहे दोनी दिल्हे असत तर तुम्ही यासी रुजू होऊन देहाये मा॥रचे मुकासबाबेचा अैवज मा॥रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

**मर्या**
**देयं रा**
**जते**

**रुजू सा॥**
**मंत्री**

तेरीख १० महरम सु॥ सबा
बार सुद सुरु सुद बार बार

पत्र क्र. १२
सु. १११७, मोहरम ११

श्री

श. १६३८, पौष शु॥ १२
इ. १७१६, डिसेंबर १९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे पौष्य शुद्ध द्वादसी भृगुवासर क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी मोकदमानी

श्री
राजा शाहू न
रपती हर्षनिधा
न बाळाजी विश्व
नाथ मुख्य प्र
धान

श्री आई आदि
पुरुष श्रीराजा शाहू
छत्रपति स्वामी कृपानि
धी तस्य परशुराम त्र्यं
बक प्रतिनिधी

मौजे निरगुडी ता॥ हवेली प्र॥ - पुणे यांसी अज्ञा केली ऐसीजे मौजे मा॥र पेशजीच्या मुकासिया-कडून दूर करून हाली राजश्री सेखोजी थोरात दिनकरराव याजकडे जमावाचे बेगमी बदल मुकासा दिल्हा आसे तर तुम्ही यासी रूजू होऊन प॥ मा॥रचे मुकासबाबेचा ऐवज मा॥रनिलेकडे वसूल देणे जाणिजे लेखनालंकार

मर्या
देयं रा
जते

रुजू सा॥
मंत्री

तेरीख १० महरम सु॥ सबा
बार सुद सुरु सुद बार बार

पत्र क्र. १३ 
सु. १११८, सवाल २६ | श्री | श. १६३९, भाद्रपद वा १३
इ. १७१७, सप्टेंबर २१

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी संवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी मंदवासर क्षेत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यांणी मोकदमानी देहाये ता॥ हावेली प्रांत जुनर वोझुर देहे तेजेवाडी देहे

**श्री**
**राजाशाहूछ त्रपतिहर्षनीधा न बाळाजी वि श्वनाथ प्रधा न**

**श्री**
**श्री आई आदि पुरु ष श्री राजाशाहु छत्रप ति स्वामि कृपानिधित स्यश्री निवास परश राम प्रतिनिधि**

१ १ येकूण देहे दोनी यासी आज्ञा केली ऐसीजे देहाये मा॥र पेशजी रा॥ सेखोजी थोरात यासी मुकासा होता ते मृत्य पावले त्याचे पुत्र रा॥ विठोजी थोरात दिनकरराव याजकडे पेशजी प्रमाणे मुकासे दिल्हे असे तर तुम्ही यासी रुजू होऊन देहाये मजकूरचे मुकासबाबेचा ऐवज मा॥रनिलेकडे वसूल देणे × लेखनालंकार

**मर्यां**
**देयं रा**
**जते**

**रुजू स॥**
**मंत्री**

तारीख २६
सवाल सु॥ समान
सुरू सुद बार बार

×अक्षर निराळे

प. क्र. १४
सु. ११९८, सवाल २६

श्री

शा. १६३९, भाद्रपद वा। १३
इ. १७१७, सप्टेंबर २१

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी सवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी मंदवासर क्षेत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी

श्री
राजा शाहू छ
त्रपति हर्षनिधा
न बाळाजी वि
श्वनाथ प्र
धान

श्री
आई आदि पुरु
ष श्री राजा शाहू छत्रप
ति स्वामी कृपानिधी त
स्य श्रीनिवास परशु
राम प्रातीनिधि

मोकदमानी मौजे नेतवडी ता। वोतूर यासी आज्ञा केली असीजे मौजे मजकूर पेशजी रा। सेखोजी थोरात याजकडे मुकासा होता ते मृत्यू पावले त्याचे पुत्र रा। विठोजी थोरात दिनकरराव याजकडे जमावाचे बेगमीबदल मुकासा दिल्हा असे तर तुम्ही यांसी रुजू होऊन मौजे मजकूरचे मुकासबाबेचा अैवज मा।रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

मर्या
देयं रा
जते

सं। –
मंत्री

तेरीख २६ सौवाल सु। समान
बार सुद
सुरु सुद बार बार

पत्र क्र. १५ } श्री { श. १६३९, भाद्रपद व॥ १३
सु. १११८, सवाल २६ } { इ. १७१७, सप्टेंबर २१

स्वत श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी सवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी मंदवासर क्षेत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी

| | | |
|---|---|---|
| ~ श्री ○ | ○ श्री ~ | मोकदमानी देहाये ता॥ |
| राजा शाहू छ | आई आदि पुरु | आवसरी प्रा॥ जुनर पैकी |
| त्रपति हर्षनिधा | ष श्रीराजा शाहू छत्रप | मौजे सिगवे मौजे कांट्रापूर |
| न बाळाजी वि | ति स्वामी कृपानिधी त | १ १ |
| श्वनाथ प्र | स्य श्रीनिवास परशु | मोजे निरगुडसर मौजे |
| धान | राम प्रतिनिधि | १ |

थोरादेल यांसी आज्ञा केली असीजे देहाये ४ मजकर पेशजी रा॥
१

सेखोजी थोरात यास मुकासे होते ते मृत्यू पावले त्याचे पुत्र रा॥ विठोजी थोरात दिनकरराव याजकडे जमावास पेशजी प्रमाणे मुकासे दिल्हे आसत तर तुम्ही यांसी रुजू होऊन देहाये मजकूरचे मुकासबाबेचा ऐवज मा॥रनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

मर्या
देयं रा
जते

रूजु सा॥
मंत्री

तरीख २६ सौवाल सु॥ समान
बार सुद
सुरु सुद बार बार

प. क्र. १६ }
सु. १११, सवाल २६ }

श्री

{ श. १६३९ भाद्रपद, व॥ १३
{ इ. १७१७, सप्टेंबर २१

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी सवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी मंदवासर क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी

| | | |
|---|---|---|
| श्री | श्री | मोकदमानी देहाये ता॥ |
| राजा शाहू छ | आई आदि पुरु | आले (आळे) प्रा॥ जुनर |
| त्रपति हर्षनिधा | ष श्री राजा शाहू छत्रप | मौजे जांबूत व मौजे |
| न बाळाजी वि | ति स्वामी कृपानिधी त | १ |
| श्वनाथ प्र | स्य श्रीनिवास वरशु | पिंपरखेड येकून दोनी |
| धान | राम प्रतिनिधी | १ |

देहे पेशजी रा॥ सेखोजी थोरात याजकडे मुकासे होते ते मृत्यू पावले त्यांचे पुत्र रा॥ विठोजी थोरात याजकडे जमावाचे बेगमीबदल मुकासे दिल्हे असत तर तुम्ही यासी रुजू होऊन देहाये मजकूरचे मुकासबाबेचा अैवज दिनकरराव याजकडे वसूल देणे लेखनालंकार

मर्या
देयं रा
जते

रुजू सां॥
मंत्री

तेरीख २६ सौवाल सु॥ समान
बार सुद सुरू सुद बार बार

पत्र क्र. १७
सु. ११११८, सवाल २६ } श्री { श.१६३९, भाद्रपद वा। १३
इ. १७१७, सप्टेंबर २१

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ४४ हेमलंबी संवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी मंदवासर क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी

**श्री**
**राजा शाहू छत्रपति हर्षनिधान बाळाजी विश्वनाथ प्रधान**

**श्री**
**आई आदि पुरुष श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी कृपानिधी तस्य श्रीनिवास परशुराम प्रतिनिधि**

याणि मोकदमानी मौजे उदरगांव ता। चाभारगोदे प्रा। कडेवलीत यासी आज्ञा केली ऐसीजे मौजे मजकूर पेशजी रा। सेखोजी थोरात यासी मु।। होता त्यास ते मृत्य पावले त्यांचे पुत्र रा। विठोजी थोरात दिनकरराव याजकडे जमावाचे बेगमीबदल मुकासा दिल्हा असे तर तुम्ही यासी रुजू होऊन मौजे मजकूरचे मुकासबाबेचा ऐवज मारनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

**मर्यादेयं राजते**

रूजु सा।
मंत्री

तेरीख २६ सौवाल सु।। समान
बार सुद सुरु सुद बार बार

प. क्र. १८      }    श्री    { श. १६३९, भाद्रपद वा। १३
सु. ११९८, सवाल २६              इ. १७१७, सप्टेंबर २१

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी सवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी मंदवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी

| | | |
|---|---|---|
| ⌣ श्री ○ | ○ श्री ⌣ | मोकदमानी मौजे रतडगाव |
| राजा शाहू छ | आई आदि पुरु | ता। पेडगाव यासी आज्ञा |
| त्रपति हर्षनिधा | ष श्री राजा शाहू छत्रप | केली ऐसीजे मौजे मजकूर |
| न बाळाजी वि | ति स्वामी कृपानिधी त | पेशजी रा। सेखोजी थोरात |
| श्वनाथ प्र | स्य श्रीनिवास परशु | यासी मुकासा होता त्यासी |
| धान | राम प्रातिनिधि | ते मृत्यू पावले त्यांचे पुत्र |

रा। विठोजी थोरात दिनकरराव याजकडे जमावाचे बेगमीस मुकासा दिल्हा असे तर तुम्ही यांसी रुजू होऊन मौजे मजकूरचे मुकासबावेचा अैवज मारनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

मर्यां
देयं रा
जते

रुजु सा।
मंत्री

तेरीख २६ सौवाल सु।। समान
बार सुद सुरु सुद बार बार

पत्र क्र. १९
सु. ११११८, सवाल २६

श्री

शा. १६३९, भाद्रपद वा १३
इ. १७१७, सप्टेंबर २१

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ४४ हेमलंबी संवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी मंदवासरे क्षेत्रिय कुळावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी

| | | |
|---|---|---|
| **श्री** | **श्री** | मोकदमानी देहाये ताा |
| **राजा शाहू छ** | **श्री आई आदि पुरु** | करडे राजणगाव देहे |
| **त्रपति हर्षनीधा** | **ष श्री राजाशाहु छत्रप** | ब्रि ताा मौजे रेणवडी |
| **न बाळाजी वि** | **ति स्वामि कृपानिधित** | प्रांत जुनर १ मौजे |
| **श्वनाथ प्रधा** | **स्य श्रीनिवास परशु** | वाडेगव्हाणे मौजे म्हसे |
| **न** | **राम प्रतिनिधि** | १ |

ताा डोगरगण मोजे येवंती यासी आज्ञा केली असीजे देहाये
१ १

मजकूर पेशजी रा सखोजी थोरात यासी मुकासे होते त्यास ते मृत्य पावले त्याचे पुत्र रा विठोजी थोरात दिनकरराव याजकडे जमावाचे बेगमीबदल मुकासे दिल्हे असत तर तुम्ही यासी रुजू होऊन देहाये मारचे मुकासबाबेचा ऐवज मारनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

**मर्या**
**देयं रा**
**जते**

**रुजू साा**
मंत्री

तारीख २६ सौवाल सुाा समान
बार सुद सुरू सुद बार बार

पत्र क्र. २०
सु. ११९८, सवाल २६ } श्री { श. १६३९, भाद्रपद वा १३
इ. १७१७, सप्टेंबर २१

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ४४ हेमलंबीनाम संवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी मंदवासर क्षेत्रीये कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी

| | |
|---|---|
| **श्री** | **श्री** |
| **राजा शाहू छ** | **श्री आई आदि पुरु** |
| **त्रपति हर्षनिधा** | **ष श्रीराजा शाहू छत्रप** |
| **न बाळाजी विश्व** | **ति स्वामी कृपानिधि त** |
| **नाथ मुख्य प्र** | **स्य श्रीनिवास परशु** |
| **धान** | **राम प्रतिनिधि** |

याणी देशमुख व देशपाडिये पा सिनर प्रात संगमनेर यास आज्ञा केली ऐसीजे पा मजकूर कसबा खेरीज करून पेशजी रा सेखोजी थोरात यासी मुकासा होता ते मृत्य पावले त्यांचे पुत्र रा विठोबा थोरात दिनकरराव यासी पेशजीप्रमाणे मुकासा दिल्हा असे तर तुम्ही यासी रुजू होऊन पा मजकूरचे अैवज खेरीज कसबा मुकासबाब भारनिलेकडे देणे लेखनालंकार

**मर्या**
**देयं रा**
**जते**

**रुजू सा**
**मंत्री**

तेरीख २६ सौवाल सुा समान
बार सुद सुरु सुद बार बार

पत्र क्र. २१
सु. ११८८, सवाल २६

श्री

शा. १६३९, भाद्रपद वा। १३
इ. १७१७, सप्टेंबर २१

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ४४ हेमलंबी संवत्सरे भाद्रपद बहुल त्रयोदसी मंदवासर क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी

| | | |
|---|---|---|
| ॑ श्री ○ | ○ श्री ॑ | मोकदमानी देहाये ता। |
| राजा शाहू छ | श्री आई आदि पुरु | पाबल प्रा। जुनर |
| त्रपती हर्षनिधा | ष श्रीराजा शाहू छत्रप | लाखणगाव देवगाव |
| न बाळाजी विश्व | ति स्वामी कृपानिधि त | १ १ |
| नाथ मुख्य प्र | स्य श्रीनिवास परशु | सवदेणे येकून देहे तीन |
| धान | राम प्रतिनिधि | १ |

यासी आज्ञा केली ऐसीजे देहाये मजकूर पेशजी रा। सेखोजी थोरात याजकडे मुकासा होता ते मृत्य पावले त्याचे पुत्र रा। विठोजी थोरात दिनकरराव याजकडे पेशजी प्रा। मुकासे दिल्हे असेत तर तुम्ही यासी रूजू होऊन देहाये मजकूरच मुकासबाबेचा ऐवज मारनिलेकडे वसूल देणे लेखनालंकार

मर्या
देयं रा
जते

रुजू सां।
मंत्री

तेरीख २६ सौवाल सुा। सबा
बार सुद सुरु सुद बार बार

प. क्र. २२
सु. ११२२, सवाल २६

श्री

श. १६४५, आषाढ वा। ९
इ. १७२३, जुलै १५

श्री ○
राजा शाहू स्वा
मि छत्रपति खं
डेराव दाभाडे
सेनापति

मा। अनाम देसमुख व देसपांडिये पा।
आकोले यासि खंडेराऊ दाभाडे सेनापती सु ॥ आर्बा अशरीन मया व अलफ पा। मजकूर फुट मुकासे वजा करून निंमे महाल राजश्री विठोजी थोरात दिनकरराऊ यांजकडे पेशजी पासून जमावाचे बेगमीस मुकासा आहे तेणेप्रमाणे सालमजकुरी करार आसे मारनिलेशी रुजुवात राहोन मुकासबाबेचा वसूल सुरलित देणें जाणिजे रा। छ २२ सवाल

मोर्तब
सुद

बार

प. क्र. २३ श्री इ. १७४५/४६

राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान यांसी आज्ञा केली ऐशीजे सेखोजी थोरात दिनकरराव पुरातन राज्यातील सेवक यांस सरंजामाबद्दल पा अकोल खांस हा माहाल हुजरून दिल्हा आहे त्यास ते शांत जहाले हाली त्याचे पुत्र रा विठोजी थोरात याचे चालवणे स्वामीस अवस्यक आहे अकोल खास परगणियांत दाभाडे खलेल करितात याकरिता हे आज्ञापत्र तुम्हास सादर केले असे तरी तुम्ही पा मजकुरास ताकीद करून सुदामत प्रमाणे यांच अंमल यांजकडे सुरलीत चाले ते गोष्ट करणे यांजवरून सेवाचाकरी घेऊन यांचा अगत्य वाद धरून चालवावयास अंतर न करणे हरएकविसी यांचे चालवीत जाणे जाणिजे

* सुदन आसा

---

* येथून अक्षर निराळे

प. क्र. २४
सु. ११४७, सफर ८ } श्रीरामोजयति श. १६६८, फाल्गुन शु. ९
इ. १७४७, जानेवारी ७

खुद जमा माहाल भांडार गृह अेवज ता। खडोजी गोगवले हवालदार माहाल भांडार ग्रह सुा। सबा आर्बेन मया व अलफ बा। जमाई नजर विठोजी थोरात दिनकरराव ताकीद दिल्ही परगणि-याची सबब मा। रा। कालोजी काले देणे परभारे कर्जदान राजश्री येमाजी सिवदेव गुजारत आपाजी गोदडे चौकीदार सदर रुपये १००० एक हजार वज्यारा....................बाकी जमा माहाल मजकूर एक हजार रुपये

मोर्त ब सुद

१००० ।

तेरीख ८ माहे सफर बार.

प. क्र. २९ | सु. ११४८, साबान २९ | श्री | श. १६६९ भाद्रपद, शु. १ | इ. १७४७, ऑगस्ट २५

○ श्री

**राजा शाहु नरप**
**ति हर्ष नीधान बा**
**ळाजी बाजीराव**
**मुख्य प्रधा**
**न**

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री बालाजी पडित प्रधान ता। मोकदम मौजे वाळकी ता। सांडस प्रां पुणें सुहर समान आरबैन मया व अलफ मौजे मार मुकासा हुजरून राजश्री विठोजी थोरात दिनकरराव यांजकडे पेशजीपासून असे त्याप्रमाणें करार करून हें आज्ञापत्र सादर केलें असें तरीं मारनिलेकडील कमाविशदारासी रुजू होऊन मुकासबाबेचा वसूल साबीक दस्तुर सुरळीत देणें जाणिजे छ २९ शाबान आज्ञा प्रमाण

**लेखन**
**सीमा**

पत्र क्र. २६
सु. ११६०, रबिलाखर २१ } श्री { श. १६८१, मार्गशीर्ष व. ९
इ. १७५९, डिसेंबर १२

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री कृष्णराव बलाल गोसावी यांसी सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार सुा सितैन मया व अलफ पो अकोले पैकी तुम्हांकडे गाव आहेत तेथील मुकासा पेसजी पासोन राजश्री विठोजी थोरात दिनकरराव याजकडे आहे त्याप्रमाणे करार असे त्यास खेरीज सरदेशमुखी दरोबस्त आकारास दरसदे रुपये १८॥· पावणे अेकोणीस प्रो देखील चढाची बेरजेस सदरहू प्रो मुकासियाचा अमल सुरळीत देत जाणे

१

जाणिजे छ २१ रा रालाखर आज्ञा प्रमाण

लेखन
सीमा

प. क्र. २७
सु. ११६०, रबिलाखर २१ } श्री { श. १६८१, मार्गशीर्ष व. ९
इ. १७५९, डिसेंबर १२

राजश्री देवजी ताकपीर व
कान्होजी ताकपीर गो

 अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद सुा सितैन मया व अलफ मौजे चास व गणोरे ताो भोजापूर पाा आकोले मुकासा राजश्री विठोजी थोरात दिनकरराव याजकडे पेशजीपासून आहे त्याप्रमाणे करार असे तरी हरदू गावची खेरीज सरदेशमुखी दरोबस्त आकारास दर सदे रुपये १८॥ पावणे अेकोणीस प्रमाणे देखील चढाची बेरिजेस सदरहू प्रमाणे मुकासीयाचा अमल सुरलीत देत जाणे[1] जाणिजे छ २१

○ श्री ~
राजा शाहू नर
पति हर्षनिधान
बाळाजि बाजि
राव प्रधान

२१ राखर बहुत काय लिहिणे

लेखन
सीमा

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. २८ | श्री | श. १६८१, मार्गशीर्ष व. १०
सु. ११६०, रबिलाखर २३ | | इ. १७५९, डिसेंबर १४

○ श्री ◡

राजा शाहू नर
पति हर्ष निधान
बाळाजि बाजि
राव प्रधान

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान ता। मोकादम मौजी इंदूरी ता। हवेली पा। अकोले सरकार संगमनेर सुा। सितेन मया व अलेफ राजश्री विठोजी थोरात दिनकरराव याजकडे मौजे मजकूर येथील मुकास बाबेचा अमल हुजुरून पेशजी पासून चालत आहे त्यास हाली मौजे मजकूरचा जाहगीर बाबती व सरदेशमुखीचा अमल मशारनिलेकडे दरोबस्त सरंजाम करार करून देऊन हे आज्ञापत्र सादर केले असे तर मारनिलेकडे याजकडून रुजू होवून दरोबस्त अमल देखील वेट बेगार व फडफर्मास व किल्ल्याची खरिदी व पागाचे गवत देखील याचा कुल अमलाचा वसूल सुरलीत याजकडे देत जाणे जाणिजे छ २३ राखर आज्ञा-प्रमाण

लेखन
सीमा

पत्र क्र. २९
सु. ११६१, जमादिलाखर २५ } श्री { श. १६८२ पौष व. १३
इ. १७६१ फब्रुआरी २

राजश्री देशमुख व देशपाडे पा। आकोले
गोसावी यांसि

स्नो। बालाजी महादेव सु॥ ईहिद सितन मया व आलफ राजश्री विठोजी थोरात दिनकरराऊ याचे मुकासे व गाव पा। मजकुरचे जफ्त केले होते ते हल्ली मोकले केली असे तरी सुदामत प्रा। मुकासियाचा व गावाचा अमल याचा याजकडे देत जाणे जाणिजे[1] छ[2] २९ जाखर

मार्त
ब सुद

---

१ व २ : येथून अक्षर निराळे

पत्र क्र. ३०
सु. ११६३, रमजान ५

श्री

शा. १६८९, चैत्र शु. ७
इ. १७६३, मार्च २१

श्री
राजाराम न
रपति हर्षनिधा
न माधवराव ब
ल्लाळ मुख्य
प्रधान

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ताा मोकदम मौजे तरडे प्राा पुणे सुाा सलास सितेन मया व अलफ मौजे मजकूर मुकासा पेशजी पासून हुजरून जमावाचे बेगमीस सरंजाम राजश्री विठोजी थोरात दिनकरराव याजकडे आहे त्या प्रो करार असे साल मजकुरी जप्ती केली होती ते मोकली करून आज्ञापत्र सादर केले असे तरी तुम्ही यासी रुजू होवून मौजे मजकूरचा अमल सितेनात तीर्थरूप राजश्री भाऊसाहेबी तह खेरीज सरदेशमुखी दरोबस्त आकारास दरसदे रुपये १८॥। पावणे येकोणीस प्रो करून दिल्हा आहे त्या प्रो अमल सुरलीत वसूल देणे जाणिजे छ ५ [1] रमजान आज्ञा प्रमाण

लेखन
सीमा

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ३१
सु. ११६३, रमजान ५

श्री

शा. १६८५, चैत्र ७
इ. १७६३, मार्च २१

श्री
राजाराम न
रपति हर्षनिधा
न माधवराव ब
ल्लाळ मुख्य
प्रधान

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री माधवराव पंडित प्रधान ता। मोकदम मौजे निरगुडी प्रा। पुणें सु॥ सलास सितैन मया व अलफ मौजे मजकूर मुकासा पेशजी पासोन हुजरून जमावाचे बेगमीस सरंजाम राजश्री विठोजी थोरात दिनकरराव यांजकडे आहे त्याप्रमाणे करार असे साल मजकुरी जप्ती केली होती ते मोकली करून आज्ञापत्र सादर केलें असे तरी तुम्ही यासी रुजू होऊन मौजे मजकूरचा अमल सितेनात तीर्थरुप राजश्री भाऊसाहेबी तह खेरीज सरदेशमुखी दरोबस्त आकारास दर सदे रुपये १८॥। पावणे अेकोणीस प्रो करून दिल्हे आहे त्याप्रो अमल सुरलीत वसुल देणें जाणिजे[1] छ ५ रमजान आज्ञाप्रमाण.

लेखन
सीमा

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ३२
सु. ११६३, रमजान ५

श्री

श. १६८५, चैत्र शु. ७
इ. १७६३, मार्च २१

श्री
राजाराम न
रपति हर्षनिधा
न माधवराव ब
ल्लाळ मुख्य
प्रधान

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री माधवराव पंडित प्रधान ताहा मोकदमानी मौजे भडकबोरी प्रां पुणे सुा सलास सितैन मया व अलफ मौजे मजकूर मुकासा पेशजी पासोन हुजरून जमावाचे बेगमीस सरंजाम राजश्री विठोजी थोरात दिनकरराव याजकडे त्याप्राो करार असे सालमजकूरी जप्ती केली होती ते मोकली करून आज्ञापत्र सादर केले असे तरी तुम्ही यांसी रुजू होऊन मौजे मारचा अमल सितैनात तीर्थरूप राजश्री भाऊसाहेबी तह खेरीज सरदेशमुखी दरोबस्त आकारास दरसदे रुपये १८॥।· पावणे अकोणीस प्रा करून दिल्हा आहे त्या प्रो अलम सुरलीत वसूल दणें जाणिजे[१] छ ५ रमजान आज्ञाप्रमाण

लेखन
सीमा

---

१ येथून अक्षर निराळे.

प. क्र. ३३
सु. ११६३, रमजान ९

श्री

श. १६०९, चैत्र शु. ७
इ. १७६३, मार्च २१

श्री

राजाराम न
रपति हर्षनिधा
न माधवराव ब
ल्लाळ मुख्य
प्रधान

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री माधवराव पंडित प्रधान ता। मोकदम मौजे भांवडी प्रा। पुणे सु॥ सलास सितैन मया व अलफ मौजे मजकुर मुकासा पेसजी पासोन हुजरून जमावांचे बेगमीस सरंजाम राजश्री विठोजी थोरात दिनकरराव यांजकडे आहे त्या प्रो. करार असे साल मजकुरी जफ्ती केली होती ते मोकलीक करोन आज्ञापत्र सादर केले असे तरी तुम्ही यांसी रुजू होवून मौजे मजकूरचा अमल सितैनात तीर्थरूप राजश्री भाऊसाहेबी तह खेरीज सरदेशमुखी दरोबस्त आकारास दरसदे रु॥ १८॥। पावणे येकोणीस प्रो करून दिल्हे आहे त्याप्रमाणे अमल सुरलीत वसूल देणे जाणिजे [1]छ ९ रमजान आज्ञाप्रमाण

लेखन
सिमा

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ३४
सु. ११६४ रबिलावल २३ } श्री { श. १६८५, भाद्रपद व. ९
इ. १७६३, ऑक्टोबर १

श्री
शीवचरणी
तत्पर निळकं
ठ महादेवनि
रंतर

आज्ञापत्र राजश्री नीलकंठ महादेव ताा मोकदमानी देहाय

ताा मांडस मौजे निरगुडी ताा हवेली
१ मौजे वालकी १
१ मौजे तरडे
१ मौजे बोरी भडक
१ मौजे भावडी

४

प्रांत पुणे सुाा आर्बा सितैन मया व आलफ देहाये मारची मोकासबाब श्री विठोजी थोरात दिनकरराव यांजकडे होती त्याची जफ्ती सालगुदस्ता सरकारांत जाली आहे त्यास सालमारपासून पूर्ववत प्रमाणे मोकासबाब त्याजकडे करार करून देऊन हे आज्ञापत्र सादर केलें असे तरी मोकासबाबेचा वसूल सालमार पासून सरकारचे नेमणुके प्राा मारनिलेकडे देत जाणे [1]छ २३ रोवल मों सुद

**मोर्तब**
**सुद**

बार

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ३५ } श्री { श. १६८५, फाल्गुन शु. ३
सु. ११६४, रमजान १ } { इ. १७६४, मार्च ९

राजमान्य राजश्री केशो गोविंद का।दार पो आकोले दी।। कवीजंग गो सेवक रघुनाथ बाजराव नमस्कार सु।। आर्बा सितैन मया व आलफ पो मारी निराला डोगर आहे तेथें कुरण आहे तें पेशजी पासून विठोजी थोरात दिनकरराव याजकडे आहे त्यास तुम्ही अडथळा केला आहे याजकडे चालो देत नाही म्हणून विदीत जाहलें त्याजवरून हे पत्र सादर केले असे तरी सदरहू कुरण मार निलेकडे सुदामत प्रमाणे चालवणे नवीन कजिया न करणे जाणिजे छ १ रमजान [1] आज्ञाप्रमाण

लेखना
वधि

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ३६ } श्री { श. १६८९, आषाढ व. ९
सु. ११६८, सफर १६ } { इ. १७६७, जुलै १३

○ श्री ◡
राघवचर-
णी तत्पर बाळा
जी माहादेव
नीरंतर

आज्ञापत्र राजश्री बाळाजी माहादेव ताा माणकोजी पाा मोकदम मौजे वीरगाव पाा अकोले सुाा समान सितैन मया व अलफ राजश्री विठोजी थोरात दिनकरराव यानी विदित केले कीं मौजे मजकूर येथील गढी श्रीमंतानी आपणास दिल्ही आहे दहा पंधरा वरसे त्या गढीत आपण राहातो गढीची बऱ्हामत आपण केली आहे गढीवर सरकारचा झेंडा लाविला आहे असे असतां आली माणकोजी पाा याने लबाडी करून आपली गढी खाली करून द्या म्हणतो तर ये विसी त्यास ताकीद जाली पाहिजे म्हणोन त्यावरून हे आज्ञापत्र सादर केले असे तर सरकारातून मशारनिलेस ते गढी दिल्ही त्यावरून त्या गढीवर सरकारचा झेंडा लावून हे तेथें राहातात गडीची बऱ्हामत यानी केली आहे ऐसे असता गढी खाली करून द्या म्हणतोस हे गोष्ट कार्याची नाही मशारनिले हली पेशजीपासून त्या गढीत राहत आले आहेत त्या प्रो राहातील त्यासी कोण्ही गोष्टीची हिक हरकत न करणे येविसी फिरोन बोभाट येवू न देणे जाणिजे [1]छ १६ सफर

मोर्तब
सुद

बार

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ३७ | श्री | श. १६९४, फाल्गुन व. ६
सु. ११७३, जिल्हेज १९ | | इ. १७७३, मार्च १३

॥ श्री ॥

राजाराम नरप
ति हर्ष निधान नाराय
णराव बल्लाळ मु
ख्य प्रधान

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री नारायणराव पंडित प्रधान ता। मोकदम मौजे इदुरी ता। हवेली पा। आकोले सरकार सगमनेर सु॥ सलास सबैन मया व आलफ विठोजी थोरात दिनकरराव याजकडे मौज मजकूर येथील मुकास बाबेचा अमल हुजरून पेशजी पासून होता त्याजवरी सनसितेनात जागीर बाबती व सरदेशमुखीचा अमल दरोबस्त फौजेस सरंजाम करार करून दिला होता त्यास ते मृत्यू पावले सबब त्याचे पुत्र अनंदराव थोरात दिनकरराव याजकडे पेशजी प्रमाणे फौजेचे बेगमीस माजे मजकूरचा दरोबस्त अमल करार करून दिल्हा असे तरी मारनिलेसी रुजू होऊन जागीर व बाबती व सरदेशमुखी व मुकासा दरोबस्त अमल वेठबेगार व फडफर्मास व किल्याचे खरीदी व पागाचे गवत देखील याचा कुल अमलचा वसूल सुरलीत देत जाणीजे छ १९ जिल्हेज [1]आज्ञाप्रमाण

लेखन
सीमा

---

१ येथून अक्षर निराळे

फ. क्रॅ ३८
सु. ११७३, जिल्हेज १९

श्री

शा. १६९४, फाल्गुन व. ६
इ. १७७३, मार्च १३

श्री
राजाराम नरप
ति हर्षनिधान नाराय
णराव बल्लाळ मु
ख्य प्रधान

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री नारायणराव पंडित प्रधान ताा मोकदम मौजे डोगरगांव ताा रुमणवाडी पाो आकोले सरकार संगमनेर सुाा सलास सबैन मया व अलफ विठोजी थोरात दिनकरराव याजकडे हुजरून पेशजी पासून मौजे मजकूरचा मुकासा होता त्याजवरी सन सितैनात कवीजंग किलेदार माजी किले अमदानगर याजकडे व गुलाम मोहिद्दीन खान याजकडे पाा मजकुर पैकी मुकाशासुधा गाव दिल्हे तेथील मुकाशाचा ऐवज माार निलेचा गेला त्या ऐवजी बालाजी माहादेव सुभेदार प्रांत गंगथडी याणी मौजे मजकूर पैकी जागीर निमे व बाबती व सरदेशमुखी दरोबस्त अमल करार करून देऊन सुभाचे पत्र करून दिल्हे आहे त्यास साल मजकुरी विठोजी थोरात मृत्यू पावले सबब त्याचे पुत्र आनंदराव थोरात दिनकरराव याजकडे पेशजी प्रमाणे फौजेचे बेगमीस मौजे मजकूरची जागीर निमे व बाबती व सरदेशमुखी व मुकासा दरोबस्त अमल करार करून दिला असे तरी माारनिलेसी रुजू होऊन सदरहू अमल सुरलीत देत जाणे जाणीजे छ १९ जिल्हेज [1]आज्ञाप्रमाण

लेखन
सीमा

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ३९
सु. ११७३, जिल्हेज १९

श्री

श. १६९४, फाल्गुन व. ६
इ. १७७३, मार्च १३

श्री
राजाराम नरप
ति हर्षनिधान नाराय
णराव बल्लाळ मु
ख्य प्रधान

 मो अनाम देशमुख व देशपांड्ये पो आकोले सरकार संगमनेर

यांसी नारायणराव बल्लाल प्रधान सु॥ सलास सबैन मया व आलफ पो मजकूर येथील गजूर तरफ खेरीज करून मोकाशाचा अंमल हुजरून पेशजीपासून विठोजी थोरात दिनकरराव यांजकडे फौजेचे बेगमीस सरंजाम चालत होता देह ७२ बाहात्तर कलमे गावचा मोकासा याची बयान

१ पो मजकूर पो देहे ७२ पो वजा कवीजंग किलेदार यानी किले आमदानगर याजकडे मोकाशासुधा गाव दिल्हे देहे २७ बाकी देहे ४५ पचेतालीस येथील खेरीज सरदेशमुखी करून दरोबस्त आकारास दरसदे रुपये १८॥।॰ प्रमाणे मोकाशाचा अमल पावणे एकूणीस प्रा कलम

१ कवीजंग माजी किले आमदानगर यास पा॥ मजकूर पो देहे २७ सतावीस मुकाशासुधा दिल्हे सबब मुकाशाचे मुबदला मारनिलेस पेशजी सन सितेनात गाव दिल्हे तेथील अंमल

२ मौजे वीरगाव मौजे इदुरी पो मजकूर या हरदु गावचा जहागीर बाबती सरदेशमुखीचा अंमल

१ मौजे डोगरगांव पो मजकूर येथील जहागिरी पो निमे व बाबती सरदेशमुखीचा अमल

३

तीन गांवचा सदरहु अमल कलम

२

येणेप्रमाणे कलमे दोन पो पंचेचाळीस गांवचा मुकासा व तीन गांवचा सदरहु अमल होता त्यास मारनिले मृत्यू पावले सबब त्याचे पुत्र राजश्री आनंदराव थोरात दिनकरराव याजकडे पूर्ववतप्रमाणे फौजेस सरंजाम करार करून हे सनद सादर केली असे तरी यासी रुजू होऊन सदरहू प्रमाणे अमलाचा वसूल सुरलीत देणे [1]जाणीजे छ १९ जिल्हेज आज्ञाप्रमाण

लेखन
सीमा

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ४०
सु. ११६५, सफर २९ } { श. १६८६, भाद्रपद शु. १
इ. १७७४, ऑगस्ट २८

श्रीवरदे

वे राजश्री आत्माराम भट बिन आनंद भट धर्माधिकारी जोशी का। नासिक प्रां। नगर................ चरणरज विद्यार्थी विठोजी राजे थोरात दिनकरराव, दंडवत विनंती की क्षेत्र मारीचे उपाध्येपण पूर्वीपासून वडीलाचे वडील तुमेच आहेत हालीही तुम्हास आपण दिधले आपेल वंशीचे कोणी क्षेत्रास येतील तीर्थ मारी तुम्हास पुजितील व प्रतीवरशी वरशासन रु॥ २५ पंचवीस व दाणे सोलले कैली खंडी १ येक प्रती वरशी पावते करून देऊ लिहिले सही मिती सके १६८६ तारणनाम सवछरे भाद्रपद सुद १ मगलवार हे लिहिले सही बीा सखो देवाजी दि॥ राणोजी देवकर (असल मोडीची नक्कल)

श्री
शाहू नरप
...............
........

---

[ श्री क्षेत्र नाशिकचे तिर्थोपाध्याय वे. रा. रा. कृष्णाजी बालाजी प्रभू धर्माधिकारी यांचेकडील अस्सल जुन्या वहीतील उतारा. ('वही ४५ पंचेचालीसावी आत्माराम प्रभूंची') या वहीत पान ७ वर हा उतारा आहे. मोडी लिपीत लिहिलेल्या या लेखाचे खाली डाव्या कोपऱ्यात विठोजी थोरातांचा शिक्का आहे. पुढें खाली देवनागरी लिपीत त्यांची नेहमीप्रमाणें वंशावळी दिली आहे.

शिक्क्यास शाई जास्त लागल्यामुळें सर्वच अक्षरे स्पष्ट वाचता येत नाहीत परंतु 'श्रीं शाहू' येवढीं अक्षरे वाचता येतात. इतर अस्पष्ट दिसतात. सदर पुस्तकात इतरत्र छापलेल्या थोरातांचे पत्रातील शिक्का व हा शिक्का याचा बाह्यात्कारी आकार सारखाच आहे. मजकुरात फरक आहे आणि तो असलाच पाहिजे. ]

प. क्र. ४१
सु. ११७८, जमादिलाखर १७ } श्री { श. १६९९, आषाढ व॥३
इ. १७७७, जुलई २३

○ श्री ⌣
राघवचर
णी तत्पर बाळा
जी महादेव
नीरंतर

आज्ञापत्र राजश्री नरसिंगराव बलाल ता। मोकदम मौजे कलस बु ॥ व मौजे नंवाबपूर व मौजे हिवर व मौजे चिखली पो। आकोले नि। गुलाम बदयुदी खान सु। समान सबैन मैया व आलेफ रो। आनंदराव थोरात दिनकरराव मोकाशी पो। मजकूर यांनी येऊन विदीत केले की सदरहु गांवचा मोकास बाबेचा हिसा सरकारचे तह प्रो। देत नाहीत याकरिता गावास ताकीद करून सरकारचे सनदेप्रो। आमचा हिसा आम्हास देवावा म्हणौन त्यावरून हे पत्र सादर केले आसे तर सरकारचे सनदेप्रो। दरसदे रुपये पावणे अेकूणवीस मोकासी यासी आकाराप्रो। हिस्सेरसी दसाल दरसाल देत जाणे जाणीजे छ ११ [1]जाखर मोर्तबसुद

**मोर्तब**
**सुद**

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ४२
सु. ११७९, जमादिलाखर ७ } श्री { श. १७००, आषाढ शु॥ ८
इ. १७७८, जून २

० श्री ~
राघवचर
णी तत्पर बाळा
जी माहादेव
नीरंतर

आज्ञापत्र राजश्री नरसिंगराव बलाल ता मोकदम मौजे समसेरपूर पा अकोले सुा तिसा साबेन मया व अलफ मौजे मार येथील मोकासी याचे सिपाई कामाकाजास राजश्री अनंदराव थोरात दिनकरराव याजकडील येत असतो त्यासी तुम्ही कजीहा खटखट करिता म्हणोन विदीत जाहाले असीयास मोकासी याकडील सिपायासी खटखट करता याचे प्रयोजन काय जो जाबसाल करणे तो मोकासीयाकडे जाऊन करावा याउपरी हे आज्ञापत्र सादर केले असे तरी मोकासीयाकडील सिपायासी कजीया केली यापरी छीन कार्यास येणार नाही. सालाबाद मोकासी यांचा अमल सुरलीत चालत आल्या प्रो देणे येविसी फिरोन बोभाट आलीया कार्यास येणार नाही जाणीजे छ ७ [1]जमादिलाखर मोर्तबसुद

मोर्तब
सुद

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ४३
सु. ११८४, रज्जब

श्री

शा. १७०५, ज्येष्ठ व॥ ४
इ. १७८३, जून १८

श्री
राजाराम चर
णी तत्पर विठो
जी सुत अनंदराव
थोरात दिनकर
राव

अजसर सुभा राजश्री अनंदराव थोरात दिनकरराव ता। मोकदम मौजे देवगाव ता। पाबल सु॥ सन आर्बा समानीन मया व अलफ मौजे मार ची कमावीस रा। अनंदराव जीवाजी याजकडे दिल्ही त्याजकडे मोकास बाबेचा अमल सुरलीत न पावीले आलीकडे दाहापाच साले निखालस अवज तुम्हाकडे राहून गेला जमा वसूल न जाले त्याचा फडशा हली करून घेतला पाहिजे बदल तुम्हांकडे हे पत्र सादर केले आसे तर मोकासबाबेचा हिसेब अनंदराव जीवाजी याजकडे जमा वसूल करून दिल्हा अलीकडील असेल तो व पेशजीचे जमा वसूल घेऊन बाफगावचे मुकामी येणे अवज तुम्हाकडून येणे तो सरकारात सुभेदाराकडे द्यावा[1] लागतो तर हिसेब घेऊन जलद येणे जाणीजे [1]छ १७ माहे रजब

मोर्तब
सुद

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ४४
सु. ११८४, जिल्हाद ९

श्री

श. १७०५, अश्विन ११
इ. १७८३, आक्टोबर ६

राजश्री आनंदराव थोरात दिनकरराव गोसावी यांसी अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री स्नो तुकोजी होलकर रामराम विनंती उपर रा मानसींग धुणे यांचा कर्जाऊ ऐवज येणे होता त्याचा हवाला तुम्ही रा माहादाजी आनंत सहस्त्रबुधे यांचा दिल्हा त्यानी तीन हप्ते करून दस्ताऐवज यांसि लिहून दिल्हा हाप्ते होऊन गेले आसीता सहस्त्रबुधे मशारनिले यानी ऐवज धुणे याजला न देता तोंड चुकावीत फिरतात म्हणोन येथे विदीत जाले त्यावरून हे पत्र लिा आसे तरी आतःपर तुम्ही पंत मशारनिले यासी हप्ते बंदीचा ऐवज न देता धुणे मशार निलेचेच पदरी घालणे रा छ ९ जिलकाद सुा आर्बा समानीन मया व आलेफ [1] बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

(मागील बाजूस शिक्का)

श्री
म्हाळसाका
त चरणी तत्प
र मल्हारजी सू
त तुकोजी हो
ळकर

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ४५
सु. ११८७, जिल्हेज १

श्री

शा. १७०८, आश्विन शुा२
इ. १७८६, सप्टेंबर २४

श्री
राजाराम चर
णी तत्पर विठो
जी सुत अनंदराव
थोरात दिनकर
राव

अजसर सुभा राजश्री अनंदराव थोरात दिनकरराव ताा मोकदम मौजे तेजेवाडी ताा हवेली प्रांत जुन्नर सुा सन सबासमानीन मया व अलफ मौजे मजकुरच्या मोकासी यासी कमावीस पेशजी राजश्री अनंदराव जीवाजी याजकडे होती त्याच्या सालातील या दिवस पावेतो हिसेब होऊन बाकी निघल तिचा फडशा करुन घेणे व पुढे कामाचा बदोबस्त जाला पाा म्हणून रो यादो गणेश कारकून पाठवले आहेत यासी रुजू होऊन मागील राहिल्या रुपयाची बाकी निंघल ती देणे व पुढे सालमारचा वसूल मागील सालाचा जमावसूल करून हिसेबाच्या रुई फडशा करून देणे जाणिजे छ १ जिल्हेज

मोर्तब
सुद

प. क्र. ४६
सु. ११८८, साबान २१ } श्री { श. १७०९, ज्येष्ठ व ॥ ९
इ. १७८७, जून ८

○ श्री ◡
राजा शाहूनर
पती हर्ष नीधा
न माधवराव ना
रायण मुख्य
प्रधान

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ता। मोकदम मोजे तेजेवाडी ता। हवेली प्रां. जुन्नर सुहूर सन समान समानीन मया व आलफ मौजे मजकूर येथील मुकाशाचा अमल राजश्री अनंदराव थोरात दिनकरराव यांजकडे फौजेचे बेगमीस सरंजाम हुजरुन पेशजी पासोन चालत आहे त्यास कचे आकारास खेरीज सरदेशमुखी करून दरसदे रु॥ १८॥। पावणे एकोणीस प्रा॥ द्यावे असा तह मुकास बाबेचा सरकारातून पेशजी करून दिल्हा आहे त्याप्रा॥ हीसा द्यावा तो देत नाही म्हणून हुजूर विदीत जाहाले त्याजवरुन हे आज्ञापत्र सादर केले असे तरी मौजे मजकुरचे मोकाशाचा हिसा कचे आकारा बमाजिबतह प्रमाणे सुरलीत देत जाणे [1] जाणीजे छ २१ साबान आज्ञाप्रमाण

लेखन
सीमा

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ४७
सु. ११८८, साबान २१

श्री

शा. १७०९, ज्येष्ठ व ॥ ७
इ. १७८७, जून ८

○ श्री
राजा शाहू नर
पती हर्ष नीधा
न माधवराव ना
रायण मुख्य
प्रधान

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ता। मोकदम मौजे कान्हेवाडी ता। चाकण प्रां जुन्नर सु॥ समान समानीन मया व अलफ मौजे मार येथिल मोकाशाचा अमल राजश्री अनंदराव थोरात दिनकरराव यांजकडे फौजेचे बेगमसि सरंजाम हुजरून पेशजी पासून चालत आहे त्यास कचे आकारास खेरीज सरदेशमुखी करून दर सदे रु॥ १८॥। पावणे येकोणीस प्रमाणें द्यावे असा तह मोकासबाबेचा सरकारातून पेशजी करून दिल्हा आहे त्याप्रमाणे हिसा असावा तो देत नाही म्हणून हुजूर विदीत जाहाले त्याजवरुन हे आज्ञापत्र सादर केले असे तरी मौजे मारचें मोकाशाचा हिसा कचे आकारास बमोजीब तहाप्रमाणे सुरलीत देत जाणें [1]जाणीजे छ २१ साबान आज्ञाप्रमाण

लेखन
सीमा

---

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ४८
सु. ११८८, साबान २१

श्री

शा. १७०९, ज्येष्ठ व॥ ७
इ. १७८७, जून ८

राजश्री तुकोजी होळकर गोसावी यांसि सकल गुणालंकरण अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ माधवराव नारायण प्रधान अशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष जे लाखणगाव ता॥ पाबल प्रां॥ जुन्नर येथील मोकाशाचा अंमल राजश्री अनंदराव थोरात दिनकरराव यांजकडे फौजेचे बेगमीस सरंजाम हुजरून पेशजी पासून चालत आहे त्यास कचे आकारास खेरीज सरदेशमूखी करून दरसदे रु॥ १८॥। पावणेयेकोणीस प्रो रयेतीपासून घ्यावे असा तह मुकास बाबेच सरकारांतून पेशजी करून दिल्हा आहे त्या प्रो हीसा द्यावा तो देत नाही म्हणून हुजुर विदीत जाहालें त्याजवरून हे पत्र तुम्हास लिहीले असे तरी तुम्ही मौजे मजकुरास ताकीद करून मोकाशाचा हिसा कचे आकारा बेमोजिब तहप्रमाणे सुरलीत देवणे जाणीजे [1]छ २१ साबान सु॥ समान समानीन मया व अलफ बहुत काय लिहीणे हे असीर्वाद

**श्री**
**राजा शाहू नर**
**पती हर्ष नीधा**
**न माधवराव ना**
**रायण मुख्य**
**प्रधान**

**लेखन**
**सीमा**

१ येथून अक्षर निराळे

प. क्र. ४९
सु. ११८८ साबान २१

श्री

शा. १७१० वैशाख व॥ ८
इ. १७८८ मे २८

○ श्री ⌣
राजा शाहू नर
पती हर्ष नीधा
न माधवराव ना
रायण मुख्य
प्रधान

आज्ञापत्र राजश्री पंत प्रधान ता॥ मोकदम मौजे वालकी ता॥ सांडस प्रां पुणे सु॥ समान समानीन मया व अलफ मौजे मजकूर येथील मोकाशाचा अंमल राजश्री अनंदराव थोरात दिनकरराव याजकडे फौजेचे बेगमीस सरंजाम हुजरून पेशजीपासून चालत आहे त्यास कचे आकारास खेरीज सरदेशमुखी करून दरसदे रुपये १८॥। पावणे येकोणीस द्यावे असा तह मुकास बाबेचा सरकारातून पेशजी करून दिल्हा आहे त्याप्रमाण हिसा द्यावा तो देत नाही म्हणोन हुजूर विदीत जाहाले त्याजवरून हे आज्ञापत्र सादर केले असे तरी मौजे मारचे मोकाशाचा हिसा कचे आकारा बमोजीबतह प्रमाणे सुरलीत देत जाणे [1] जाणीजे छ २१ साबान आज्ञाप्रमाण.

लेखन
सीमा

---

१ येथून हस्ताक्षर निराळे.

प. क्र. ५०
सु. १२०० रज्जब १

श्री { श. १७२१ मार्गशीर्ष शु॥३
इ. १७९९ नोव्हेंबर २२

श्री
ज्योति स्वरुपच
रणी तत्पर माहाद
जी सूत दवलतरा
व शिंदे निरंत
र

अज सुभा राजश्री दौलतराव शिंदे ता॥ मोकदमानी मौजे वडनेरे ता॥ गांजीभोयरे प्रां जुनर सु॥ मयातेन आलेफ मौजे मा॥रकडे रा॥ आनंदराव थोरात दिनकरराव याच्या मोकाशाचा अैवज बलवंतराव गोपाल व बालाजी जनार्दन व बाजी कृष्ण याच्या अमलाखाली राहिला आहे तो अैवज अमलदार घेऊन गेले म्हणोन लबाड्या करितां आणि अैवजाचा सुरलीत फडशा करीत नाही म्हणोन विदीत जाले त्याजवरुन हे ताकीद सादर जाली आसे तरी दिनकरराव याच्या अैवजाचा मागील फडशा करून देऊन पुढे आमल सुरलीत देत जाणे फिरोन बोभाट आल्यास कार्यास येणार नाही सदरहू अैवज दिनकरराव यानी रा॥ आनंदराव बाजी का॥दार याजकडे देविला आहे तरी तुम्ही बाकीसुद्धा अैवजाचा फडशा करुन देणे छ २१ [1]रजब मोर्तबसुद

मोर्तब
सुद

---

१ मोर्तबसूद हस्ताक्षर अधिक गर्द शाईने वेगळ्या वळणाचे आहे.

प. क्र. ५१ } श्री { श. १७२१ मार्गशीर्ष शु॥ ३
सु. १२०० रज्जब १ इ. १७९९ नोव्हेंबर २९

श्री
ज्योतिस्वरुपच
रणी तत्पर महाद
जीसुत दवलतरा
व शिंदे निरंत
र

अज सुभा राजश्री दौलतराव ।सिंदे ता। मोकदमान मौजे भावडी ता। सांडस प्रां पुणे सुहूर मयातेन व आलेफ मौजे मजकुराकडे राजश्री आनंदराव थोरात दिनकरराव याजकडील मोकासबाबेचा ऐवज पाच सात वर्षे देत नाही वटाईकरिता म्हणोन विदीत जाले त्यावरून ही ताकीद सादर केली आसे तरी मौजे मजकूरचा मोकासबाबेचा ऐवज आनंदराव बाजी कादार याजकडे देविला आसे तरी सदरहू अैवजाचा फडशा वाजवीचे रुईने करून देणे दिकत केल्यास स्वार पाठविले जातील येविसी फिरोन बोभाट आल्यास कार्यास येणार नाही जाणिजे छ १ रजब [1] मोर्तबसुद

मोर्तब
सुद

---

१ येथून हस्ताक्षर निराळे.

प. क्र. ५२
सु. ११२६ जमादिलाखर २२ } श्री { श. १७५७ आश्विन व॥ ८
इ. १८३५ आक्टोबर १५

राजश्री मुलजीशेटभाईजी मामलेदार ता॥ आकोले गोसावी थांसी

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्यस्नो॥ येशवंतराव थोरात दिनकरराव जाहागीरदार ठाणे वीरगाव रामराम विनंती येथील कुशल ता॥ आश्विन व॥ ८ पावेतो वर्तमान यथास्थित आसे विशेष आपण पत्र पाठविले ते पावले पत्री मजकूर की इनामी सरंजामी गाव दुमाले जागीरदार याजकडे चालत आहेत त्याचे संपादकाचे नाव वगैरे प्रकरणी नमुन्याप्रो॥ तक्ता करून पाठवणे-विसी सरकारचे पत्र फार निकडीचे आले आहे तरी आपले संपादकाचे नाव सनदपत्र आसल ती घेऊन यावे त्यास आमच डोले दुखू आले आहेत याज-करिता दोन दिवस अवकाश आहे आमाचा आराम जाला म्हणजे भेटीस येतो संपादकाचे नावाची यादी अलाहिदा पाठविली आहे पावेल कलावे बहुत काय लिहीणे लोभ करावा ही विनंती

यादी येशवंतराव थोरात दिनकरराव जागीरदार मौजे वीरगाव मु॥ सन १२४५ फसली आमचे सरंजामाचे संपादकाचे नावाचा तपशील.

१ मुख्य शेकोजी थोरात दिनकरराव त्यांचे पुत्र
१ विठ्ठलराव थोरात दिनकरराव त्यांचे पुत्र
१ अनंदराव थोरात दिनकरराव यांचे पुत्र
१ येशवंतराव थोरात दिनकरराव हली वहिवाट चालत आहे

४

येणेप्रो॥ पेशजीपासून वहिवाट चालत आली आहे

प. क्र. ५३ }
रबिलाखर २३ }

( सदरचे पत्र अपूर्ण आहे – वरील मजकूराचा तुकडा अद्याप मिळालेला नाही. पत्राचा फक्त अर्धा तुकडा मिळाला आहे. )

स्त पा मजकूर पो कवीजंग बहादर नगरकर याजकडे देखील मुकासबाब सरंजाम करार करून गाव दिल्हे तेथील मुकासबाबेचे अेवजी सदरहू दोन्ही गाव याजकडें सरंजाम करार करून देऊन हे सनद सादर केली असे तर सदरहू दोन्ही गावचा बाबती सरदेशमुखीचा व जाहागिरीचा आमल दरोबस्त देखील वेठबेगार व फडफर्मासी व किल्याचा खरिदी व पागाचे गवत याचा अमल याजकडे देत जाणे तुम्हास मजुरा पडेल [1] जाणिजे छ २३ राखर
आज्ञाप्रमाण

लेखन
सीमा

वीरगांवची वगैरे विठोजी थोरात
यास सनद

---

१ येथून हस्ताक्षर निराळे.

प. क्र. ५४ श्री तारीख महिना वगैरे नाही.

राजश्री माहादाजी आंबाजी यासि आज्ञा केली ऐशीजे पा अंकोल खास सरकार संगमनेर सेखोजी थोरात दिनकरराव याजकडे सरंजामाचे बेगमीबदल दिल्हा आहे त्यास ते ज्ञात जाहाले हाली त्यांचे पुत्र रा विठोजी थोरात याचे चालवणे स्वामीस अवश्यक आहे पा मजकुरी दाभाडी याकडून खलेल जाहली आहे म्हणून विदीत जाहले याकरिता हाली राजश्री पंतप्रधान यांस आज्ञापत्र सादर केले असे तरी तुम्ही पंडित मशारनिलेस सांगून पा मारास ताकीद करून यांचा अमल सुरलीत चाले ते गोष्टी करणे स्वामिस अगत्य जाणून लिहिले असे हर एकवीसी याचे साहिल्यास अगर चालवावयास अंतर न करणे [१]बहुत काय लिहिणे

(पत्रातील 'बहुत काय लिहिणे' हे हस्ताक्षर शाहू महाराजांचें असावे)

---

१ येथून हस्ताक्षर निराळे.

प. क्र. ५५ तारीख महिना वगैरे नाही.

(जुना अस्सल शिक्का फाटलेला असून त्यातील एकदोन अक्षरेच शिल्लक राहिली आहेत. सुरवातीचे मजकूरावर 'इनाम कमिशन बी' असा इंग्रजी गोल शिक्का आहे. मोठ्या ठश्याचा ३०७९८ असा नंबर कागदाचे सुरवातीस मजकुरावर व कागदाचे मागील बाजूस मजकुराखाली दिलेला आहे)

अज्ञापत्र राजश्री बापूजी श्री – –
ता संताजी व फेगोजी (पा) टी (ल) थो
रात मौजे पींपलगांव त – –
सुा खमस अशरीन मया अलफ
अर्जदास्त पाठविली ते पावले वर्तमान
विदीत जाले पाा लखमोजी थोरा
त गांवास आले आहेत त्यांनी – –
– –पत्री साठी कटकट मांडली अ– –
– –हे दिवस पेरणीचे या दि– – –
– –ची खटखट केली या – – –
– – वाणी होते असे नाही अ – –
आपली नांदणूक गांवकरी – – तना
ही याउपरी आज्ञा कराव – –
केली पाहिजे म्हणून लिहीले त्यावरून ल
खमोजी थोरात यास ताकीद पत्र
– – ले तुा पाठविले आहे या उ – –
– – सी खटखट करणार ना (नाहींत)
वी नवी कुले येतील त्यास – –
नवगावची कुले – –
दी – – – –

(मागील बाजूस) – – –

का – – –
नाही फ – –
लपाा लखमोजी थोरात
ताकीद पत्र लिहिले आहे याउपरीं
ते तुम्हास सेव पत्री – –
ट करणार नाहीत तुम्ही गावीची
लावणी करुन कीर्दी आबादाना करणे
पेस्तर सराईस दिवाली दसरा – –
ली यावरी तुम्हास हुजूर अ – –
– – जी पगडा यास हुजूर
– – गोत देऊन गोत मु – –
– – राव त्याची काजिया – –
ला जाईल तुम्ही गावीची लाव
णी करुन सुखरूप – –
– –वले

मोर्तब
सुद

30798

(इंग्रजी शिक्क्याखाली थोडा मोडी मजकूर व शेवटी १८९६ असे लिहीले आहे. हा मजकूर नंतरचा इनाम कमिशनच्या वेळचा असावा. )
सदरचा कागद वाळवे येथे गेलो असता उपलब्ध झाला.